



नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

रौप्य महोत्सवी वर्ष

२५

१९८३-२००७

# भाषा आणि जीवन

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

वर्ष २५ | अंक २

उन्हाळा | २००७

अनुक्रमणिका








## अनुक्रमणिका

संपादकीय/भाषेचे भवितव्य : /प्र.ना.परांजपे/१
आदरांजली/विद्याव्रती डॉ. वा.के. लेले/ कल्याण काळे/८
भाषा-कथा-संस्कृती/नवी भारतविद्या : एक प्रात्यक्षिक/विश्वनाथ खैरे/११
भाषा-शिक्षणाचा 'मूलगामी' विचार/ रमेश पानसे/१४
'आरे भाषा निघंटुवु' : एक परिचय/ माणिक धनपलवार/२६
माध्यमे भाषा घडवू(ही) शकतात/उज्ज्वला बर्वे/३५
ज्याची त्याची प्रचीती/ (१) बांधू शब्दार्थांच्या गाठी/विद्यागौरी टिळक/३९
(२) आर्यांचा भाषाविकास/जयश्री काटीकर/४२
दखलपात्र/(१) भाषावार प्रांतरचना आणि रा.एकात्मता/रामचंद्र गुहा/सुप्रिया सहस्रबुद्धे/४५
(२) मराठीचा पुळका आणि विळखा/जयदेव डोळे/४६
(३) मागचं-पुढचं/प्रशांत परदेशी/४९
(४) प्रतिकाराचे सौंदर्यशास्त्र/आनंद जोशी/५३
पुस्तक-परीक्षणे : १ - 'शब्दानुबंध'/सुमन बेलवलकर/५५
२ - भाषाशिक्षणातील मर्मदृष्टी/नीलिमा गुंडी/६०
३ - सांस्कृतिक इतिहासाची प्राथमिक सामग्री/आशा मुंडले/६३
४ - 'संस्कृत साहित्य परिचय'/सरोजा भाटे/६७
५ - रसरशीत अनुभव देणाऱ्या कविता/विजया चौधरी/६९
प्रतिसाद/(१) डॉ. गीता भागवत, (२) डॉ.क.कृ. क्षीरसागर,
(३) रमेश पानसे, (५) माधवी आपटे/७७
भाषा-वार्ता/७०
परिषद-वार्ता/७१
लेखक-परिचय/८०, आवरण पृष्ठ ३
चुकीची दुरुस्ती/अशोक रा.केळकर/३४
परीक्षणासाठी आलेली पुस्तके/५४
भाषाविषयक लेखन-सूची : २००६/यशोधरा पवार/७९
मुखपृष्ठासंबंधी/पाणिनी/७
पत्रिकेबद्दलचे वार्षिक निवेदन/१३
पानपूरके/६२, ६८

संपादक : प्र.ना. परांजपे
संपादन-सल्लागार : अशोक रा. केळकर, गं.ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्नसन, अंजली सोमण
संपादन-समिती : प्र.ना. परांजपे (प्रमुख), विजया देव, मृणालिनी शहा, नीलिमा गुंडी
मुखपृष्ठ/विनय सायनेकर, सुप्रिया खारकर
संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके : प्र.ना. परांजपे, सी-१, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११ ००७. दूरध्वनी (०२०) २५६९४६१७
प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा : नीलिमा गुंडी, कार्यवाह, 'मराठी अभ्यास परिषद' ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११००२. दूरध्वनी (०२०) २४४८६०१५
मुद्रण-स्थळ : भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे ५१. दूरध्वनी (०२०) २४३४८७५६
प्रकाशन : त्रैमासिक; जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी)

सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.** **या अंकाचे मूल्य रु. २५/-**

# भाषेचे भवितव्य

*[डॉ. डेव्हिड क्रिस्टल या ब्रिटिश भाषावैज्ञानिकाचे एक भाषण पुण्यातील ब्रिटिश लायब्ररीतर्फे १३ ऑक्टोबर २००४ रोजी आयोजित करण्यात आले होते. त्या भाषणाचा विषय 'भाषेचे भवितव्य' हा होता; त्यात इंग्लिशचा विचार होता, त्याचप्रमाणे जगातील अन्य भाषांचाही विचार होता. प्रस्तुत संपादकीयामध्ये त्या भाषणाचा गोषवारा दिला आहे.*

*डॉ. डेव्हिड क्रिस्टल यांचा जन्म उत्तर आयर्लंडमधील लिस्बर्न या गावी १९४१मध्ये झाला. त्यांनी १९६६मध्ये लंडन विद्यापीठातून इंग्लिशमध्ये पीएच.डी. पदवी मिळवली. रेडिंग विद्यापीठात अध्यापन करत असताना त्यांनी अमेरिका, कॅनडा, दक्षिण अमेरिका येथील अनेक विद्यापीठांत पाहुणे प्राध्यापक म्हणून काम केले. सध्या ते वेल्स विद्यापीठात भाषाविज्ञान या विषयाचे मानद प्राध्यापक असून उत्तर वेल्समध्ये त्यांचे वास्तव्य असते. गेल्या ४० वर्षांत त्यांनी १००पेक्षा अधिक पुस्तके लिहिली असून त्यांत भाषाविज्ञान, शैलीविज्ञान यांची ओळख करून देणाऱ्या पुस्तकांपासून भाषेच्या ज्ञानकोशापर्यंतच्या अनेक ग्रंथांचा समावेश आहे. अतिशय सहज, सोपी भाषा, तर्कशुद्ध व ओघवती मांडणी आणि अद्ययावत् संशोधनाचा मागोवा ही त्यांच्या लेखनाची काही वैशिष्ट्ये.*

*अत्यंत मानाचा असा 'ऑर्डर ऑफ दि ब्रिटिश एंपायर' हा किताब त्यांना १९९५मध्ये देण्यात आला.]*

डॉ. क्रिस्टल यांच्या मते इसवी सन १९९१ ते २००० हे दशक भाषिक क्रांतीचे होते. त्या दशकात तीन क्रांतिकारक प्रवाहांचा आपल्यावर परिणाम झाला - इतका की आता भाषिक जग पूर्वीसारखे कधीच होऊ शकणार नाही. आजची तरुण पिढी भाषिक जाण व विकास यातील नवीन युगाच्या उंबरठ्यावर उभी आहे. हे नवीन युग क्रांतिकारी व रोमांचक आहे. याला तीन कारणे आहेत : १९९०च्या दशकात जगाला प्रथमच एक जागतिक भाषा - इंग्लिश - मिळाली. (क्रिस्टल यांच्या मते १९९०पूर्वी इंग्लिश ही जागतिक भाषा नव्हती) दुसरे कारण असे की जगातील निम्म्या भाषा मृत्युपंथावर आहेत हे प्रथमच या दशकात लक्षात आले आणि तिसरे कारण असे की या दशकात माणसाला प्रथमच एक नवे संज्ञापन-माध्यम मिळाले. क्रिस्टल यांनी सांगितले की माणसाला नवी संज्ञापन-माध्यमे सहजासहजी मिळत नाहीत. सुमारे ५० हजार वर्षांपूर्वी माणसाला पहिले संज्ञापनमाध्यम- वाणी - मिळाले. माणूस

त्या वेळी बोलायला शिकला. त्यानंतर ४० हजार वर्षांनी - म्हणजे आजच्या दृष्टीने दहा हजार वर्षांपूर्वी माणूस लिहायला शिकला त्या वेळी त्याला दुसरे संज्ञापनमाध्यम - लेखन- मिळाले. त्यानंतरच्या दहा हजार वर्षांत - म्हणजे १९९०पर्यंत त्याला बोलणे व लिहिणे ही दोनच संज्ञापन-माध्यमे माहीत होती. १९९१मध्ये वर्ल्ड वाइड वेब (www)चा शोध लावण्यात आला आणि माणसाला एक नवे - तिसरे - संज्ञापन-माध्यम उपलब्ध झाले : इंटरनेट. १९९५च्या सुमारास इमेल, चॅटरूम यांचा वापर सुरू झाला. इंटरनेटमुळे भाषेच्या वाटचालीत मूलभूत फरक घडून येत आहे.

क्रिस्टल यांनी इंग्लिशचा वापर करणाऱ्यांची तीन गटात विभागणी केली.

(१) इंग्लिश भाषा ही ज्यांची स्व-भाषा आहे असे सुमारे ४० कोटी लोक. त्यांत इंग्लंड, आयर्लंड, उत्तर अमेरिका, कॅनडा, कॅरिबियन बेटे, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड आणि दक्षिण आफ्रिका या देशांतील लोकांचा समावेश होतो.

(२) इंग्लिश ही ज्यांची द्वितीय भाषा आहे असे लोक. ज्या देशांत इंग्लिशला अधिकृत दर्जा आहे, मान्यता आहे अशा सुमारे ६० देशांची इंग्लिश ही द्वितीय भाषा आहे. त्यांत भारत, सिंगापूर, नायजेरिया, घाना इत्यादी देशांचा समावेश होतो. या लोकांची संख्या सुमारे ४० कोटी आहे.

(३) तिसऱ्या गटातील लोकांच्या दृष्टीने इंग्लिश ही एक परकीय भाषा - परभाषा - आहे. इंग्लिश ही स्व-भाषा असलेल्या आठ देशांची लोकसंख्या दरवर्षी सुमारे एक टक्क्याने वाढत आहे; याउलट इंग्लिश ही द्वितीय भाषा असणाऱ्या देशांची लोकसंख्या सुमारे तीन टक्क्यांनी वाढत आहे. त्यामुळे पन्नास वर्षांनी इंग्लिश स्वभाषकांच्या संख्येपेक्षा इंग्लिशच्या द्वितीय भाषकांची संख्या दुप्पट होईल. 'इंडिया टुडे'ने केलेल्या एका पाहणीत असे आढळले होते की मोडकेतोडके का होईना पण इंग्लिश समजणाऱ्यांची भारतातील लोकसंख्या भारताच्या एकूण लोकसंख्येच्या एकतृतीयांश, म्हणजे सुमारे ३४ कोटी आहे. याचा अर्थ असा की इंग्लंड, उत्तर अमेरिका, कॅनडा, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड व दक्षिण आफ्रिका यांच्या एकत्रित लोकसंख्येपेक्षा इंग्लिश समजू शकणाऱ्या भारतीयांची संख्या अधिक अधिक आहे. त्यामुळे द्वितीय भाषा म्हणून इंग्लिशचा विकास कसा होतो हे भारतात ठरणार आहे !

तिसऱ्या गटात - जेथे इंग्लिशचा वापर 'परभाषा' म्हणून होतो - जगातील उरलेल्या सुमारे १२० देशांचा समावेश होतो. चीन, जपान, रशिया, मध्य व दक्षिण अमेरिकेतील सर्व देश व युरोपमधील सर्व देश यांमध्ये इंग्लिश ही एक परभाषा म्हणून वापरली जाते. या लोकांची संख्या ६० ते ७० कोटी आहे. अशा रीतीने इंग्लिशचा वापर करणाऱ्यांची एकूण लोकसंख्या १४० ते १५० कोटी म्हणजे जगाच्या एकूण

लोकसंख्येच्या एकचतुर्थांश आहे. म्हणजेच जगातील तीनचतुर्थांश लोक इंग्लिशचा वापर करत नाहीत. संपर्क भाषा (=लिंग्वा फ्रँका) या संकल्पनेचा अर्थ समजावून घेणे महत्त्वाचे आहे. संपर्क भाषा हे एक उपकरण असते- काम करून घेण्यासाठी आणि काम करून घेण्यापुरतेच वापरण्याचे ते एक हत्यार असते, एक विनिमयसाधन असते. पैसा, वजन या विनिमसाधनांसारखेच एक विनिमयसाधन! भाषेच्या क्षेत्रातही अशा विनिमयसाधनाची जगाला गरज भासते; कारण जगातील लोकांना एकमेकांशी बोलायचे असते, परस्परांशी व्यवहार करायचा असतो. (साठ वर्षांपूर्वी संयुक्त राष्ट्रसंघाची स्थापना झाली तेव्हा त्याची सदस्यसंख्या ५० होती; आज ती १९१ आहे. म्हणजे एकमेकांशी बोलू इच्छिणाऱ्या, व्यवहार करू इच्छिणाऱ्या देशांची संख्या साठ वर्षांत चौपट झाली आहे.)

इंग्लिश ही जागतिक भाषा होण्याचे एकमेव कारण म्हणजे तिची ताकद. ती चार प्रकारची आहे : ब्रिटिश साम्राज्यामुळे मिळालेली राजकीय ताकद; ज्ञानाची ताकद - जगातील ८० टक्के वैज्ञानिक प्रकाशनांची भाषा इंग्रजी असते; आर्थिक ताकद - जगातील बहुसंख्य बँकिंग संस्था त्यांचा व्यवहार इंग्रजीत करतात. इंग्रजीची चौथी ताकद सांस्कृतिक आहे. २०व्या शतकातील सर्व नव्या सांस्कृतिक बाबी इंग्लिश भाषिक देशांत सुरू झाल्या; किंवा त्यांचा मार्ग प्रशस्त करण्याचे, सुकर करण्याचे काम इंग्लिश भाषकांनी केले. नभोवाणी, चित्रवाणी, चित्रपट, जाहिरात, वृत्तसंस्था, विमान प्रवासाचे नियंत्रण, इंटरनेट. चित्रपटाचा शोध फ्रान्समध्ये लागला. पण नंतरच्या वीस वर्षांत चित्रपट कुठे पोचला ? हॉलिवुड आणि बॉलिवुड ! आज जगात निर्माण होणाऱ्या चित्रपटांपैकी ८५ टक्के चित्रपटांची भाषा इंग्रजी असते.

एखादी भाषा 'जागतिक' होते तेव्हा तिचे काय होते ? किंवा तिला नेमके काय होते ? इतर देशांनी इंग्लिश भाषा दत्तक घेतली आणि आपल्या गरजांनुसार तिच्यात बदल केले. एखादी भाषा आपण उसनी घेतो आणि काही काळानंतर आपल्याला ती आपलीच आहे, आपल्या मालकीची आहे असे वाटायला लागते. दुसऱ्या एखाद्या देशाने भाषा घेणे अणि संपर्कभाषा म्हणून किंवा अन्य एखाद्या कामासाठी तिचा उपयोग करणे हा भाषेचा विशेषाधिकार आहे. अशा वेळी मूळ देशाने तिला मोकळी सोडली पाहिजे. हे अपत्यांसारखे आहे. तुम्हाला अपत्ये होतात, वाढतात मोठी होतात आणि त्यानंतर त्यांना मोकळे सोडून देण्याची, घराच्या बंधनातून मुक्त करण्याची वेळ येते. त्यांना धरून ठेवणे त्यांच्या दृष्टीने योग्य नसते, आणि तुमच्याही. त्यांना आपले स्वत:चे आयुष्य जगू द्यावे. अमेरिकी लोकांनी १७व्या शतकात इंग्रजी घेतली तेव्हा तिच्या उच्चारापासून स्पेलिंगपर्यंत सर्व गोष्टींबद्दल ब्रिटिश लोक तक्रार

करीत. अमेरिकी इंग्लिशचा द्वेष करणाऱ्यांची एक संघटनाही त्या वेळी इंग्लंडमध्ये स्थापन झाली होती. आता अमेरिकन लोक इतर देशांच्या इंग्लिशबद्दल तक्रार करतात !

भाषा आत्मसात व्हायला तीन पिढ्या लागतात. त्यानंतर भाषा कुठून आली हे मागे वळून पाहाणे बंद होते. स्वातंत्र्यानंतरच्या पहिल्या पिढीत मागे वळून पाहाणे अपरिहार्य असते. जीवनाच्या इतर क्षेत्रांप्रमाणे भाषेतही वसाहतोत्तरवादी (पोस्ट-कलोनिअॅलिझम) प्रवृत्ती असते. दुसऱ्या पिढीतही असते. आईवडिलांना ब्रिटिश इंग्लिशबद्दल जी श्रद्धा, भीती असते तिचा अंश मुलांमध्येही उतरतो. पण त्यांच्या मुलांना - तिसऱ्या पिढीला- तसे वाटेनासे होते. त्या भाषेला आपण हवा तसा आकार देऊ शकतो, असा आत्मविश्वास त्यांना वाटू लागतो. त्यांना पाठिंबा देणाऱ्या संस्थांची संख्या जसजशी वाढत जाते तसतसा त्यांचा आत्मविश्वासही वाढत जातो. या संस्था म्हणजे लेखक, कवी, कादंबरीकार, नाटककार, पत्रकार, चित्रपटांचे लेखक-दिग्दर्शक, शिक्षक. विद्यार्थ्यांचे भाषेबद्दलचे सहजज्ञान (इंट्युइशन) घडवण्यात शिक्षकांचा मोठा वाटा असतो. शिक्षकांना भाषेबद्दल अपराधीपणाची भावना असेल तर ती त्यांच्या विद्यार्थ्यांमध्येही संक्रांत होते.

जगभर जे चालले आहे, तेच भारतातही घडत आहे. भारताला भेडसावणाऱ्या भाषिक समस्याच इतर देशांनाही भेडसावत आहेत. त्या त्या देशांतील इंग्रजी भाषा स्थानिक भाषांच्या संस्कारांमुळे बदलत आहे. भारतातील 'हिंग्लिश'प्रमाणे सिंगापूरमध्ये 'सिंग्लिश', चीनमध्ये 'चिंग्लिश', स्पेनमध्ये 'स्पँग्लिश', जपानमध्ये 'जॅपिनिंग्लिश, आणि इंग्लंडमध्ये समाविष्ट असलेल्या वेल्सची 'वेल्शिंग्लिश' अशी इंग्लिशची अनेक रूपे तयार झाली आहेत. त्यातून परस्परसंवाद व स्वत:ची ओळख (आयडेंटिटी) हे पुढचे प्रश्न निर्माण होतात. अन्य भाषकांशी संवाद साधण्यासाठी जागतिक भाषेची गरज असते आणि स्वत:ची स्वतंत्र ओळख टिकवण्यासाठी स्थानिक भाषेची, 'आपल्या' भाषेची आवश्यकत असते. एखाद्या परक्या भाषकासारखे हुबेहूब बोलता यावे अशी इच्छा फक्त एकाच प्रकारच्या माणसाला असते - गुप्तहेर ! आपली खरी ओळख लपवता यावी, इतरांपासून आपण वेगळे उठून दिसू नये अशी फक्त गुप्तहेरांची इच्छा असते. म्हणून आपल्या स्थानिक भाषेबद्दल - हिंग्लिश, सिंग्लिश किंवा आणखी एखादी - आपल्याला अभिमान वाटणे साहजिक आहे, योग्यही आहे. जागतिक भाषा बनताना इंग्लिशचे इतके प्रकार तयार होतील असे कुणालाही वाटले नव्हते. इंग्लिशमध्ये शिरलेल्या स्थानिक भाषांतील शब्दांची संख्या प्रचंड आहे. दक्षिण आफ्रिकेतील इंग्लिशच्या शब्दकोशात सुमारे दहा हजार शब्द असे आहेत की जे फक्त दक्षिण आफ्रिकेतच वापरले जातात. तसेच खास जमैकन असलेले १५००० शब्द जमैकन

इंग्लिशमध्ये आहेत.

संवाद आणि स्वत:ची ओळख यामध्ये स्वत:ची ओळख अधिक महत्त्वाची असते, कारण तिचा संबंध माणसाच्या हृदयाशी असतो. आपल्या भाषेच्या समर्थनासाठी मिरवणुका, हरताळ, उपोषणे इ. मार्गही चोखाळायला माणूस तयार असतो. हे भारतात झाले आहे तसेच क्वीबेक, ब्रसेल्स अशा अनेक ठिकाणीही झाले आहे. आपल्या भाषेसाठी माणसे मरायलाही तयार असतात; पण संपर्क भाषेसाठी कोणी कधी जिवाची बाजी लावत नाही. संवाद साधण्यासाठी लढाईची गरज नसते.

जगात सध्या सुमारे ६००० भाषा आहेत. पण त्यापैकी सुमारे ३००० भाषा इतक्या आजारी आहेत की त्या लवकरच मृत होण्याची शक्यता आहे. दर दोन आठवड्यांनी कुठे ना कुठेतरी एक भाषा मरते आहे. म्हणजे, त्या भाषेचा अखेरचा भाषक काळाच्या पडद्याआड जात आहे. एखाद्या भाषेचा अखेरचा भाषक मरतो तेव्हा ती भाषा मरते. सध्या जगात सुमारे ६० भाषा अशा आहेत की त्यांचा प्रत्येकी एकच भाषक जिवंत आहे. जगातल्या सुमारे ९६ टक्के भाषा फक्त चार टक्के लोक बोलतात. न्यू गिनीमध्ये ७५० भाषा बोलल्या जातात; नायजेरियात ४५०. भारतातही शेकडो भाषा बोलल्या जातात. यातल्या अनेक भाषा आज धोक्याच्या क्षेत्रात आहेत. छोट्या आदिवासी समाजांच्या भाषा नष्ट होण्याची आणि त्यांची ओळख पुसली जाण्याची भीती आहे. कारण इंग्रजी भाषेचा प्रचंड स्टीमरोलर त्यांना दाबून टाकत आहे. आणि स्टीमरोलर फक्त इंग्लिश भाषेचाच नाही; दक्षिण अमेरिकेत तो स्पॅनिश भाषेचा आहे, नायजेरियासारख्या आफ्रिकी देशांत अरेबिकचा आहे, आणि रशियन प्रजासत्ताक व आसपासच्या देशांत रशियनचा आहे. त्या त्या राष्ट्रातील भाषक जागे राहून काही हालचाल करतील तरच या स्टीमरोलरना प्रतिबंध होईल.

आपल्या भाषेचे रक्षण करायचे म्हणजे काय करायचे ? सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्या भाषेच्या भाषकांना आपली भाषा जगण्याची व तिला जगवण्याची निकड वाटली पाहिजे. दुसरी गोष्ट म्हणजे तशी निकड सरकारलाही वाटली पाहिजे. भाषिक बहुलतेचे व बहुविधतेचे महत्त्व जगातील सरकारांना पटले पाहिजे. बहुतेक सरकारांना जनतेच्या सांस्कृतिक बहुविधतेचा अभिमान वाटतो. पण काही भागांत भाषिक अल्पसंख्याकांची भीती बाळगली जाते. उदाहरणार्थ, आफ्रिकेत वंश व भाषा परस्परांशी निगडित आहेत. इतरत्र - विशेषत: युरोपमध्ये - भाषिक अल्पसंख्याकांचे हक्क जपण्यासाठी कायदे करण्यात आले आहेत. संयुक्त राष्ट्रसंघाने मानवी हक्कांचा जाहीरनामा जारी केला आहे; पण मानवाच्या भाषिक हक्कांचा जाहीरनामा तयार केलेला नाही.





अनुक्रमणिका

भाषेच्या रक्षणासाठी तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे पैसा. भाषेला जगवण्याचे काम खर्चिक असते. विद्यार्थ्यांचे शिक्षण, शिक्षकांचे प्रशिक्षण, पुस्तके लिहून घेणे, ती छापणे व विद्यार्थ्यांना उपलब्ध करून देणे, जिथे ती भाषा बोलली जाईल अशा जागा निर्माण करणे, इंटरनेटची टर्मिनल्स, 'चॅटरूम्स' तयार करणे - किती पैसे लागतील यासाठी ? दरवर्षी सुमारे दोनशे हजार डॉलर असा हिशोब कुणीतरी केला आहे. तीन हजार भाषांना प्रत्येकी दोनशे हजार डॉलर - म्हणजे एकूण साठ कोटी डॉलर (२७०० कोटी रुपये). प्रथमदर्शनी ही रक्कम मोठी दिसली तरी तेवढा फायदा तेल- उत्पादक राष्ट्रे एका दिवसात कमावतात किंवा तेवढे उत्पन्न बिल गेट्स अर्ध्या तासात मिळवतो. भाषिक बहुविधतेचे जतन करण्याचा निश्चय जगाने केला तर ती रक्कम उभी राहील आणि पुरेशा लोकांनी आवाज उठवला तर जगाला त्या गोष्टीचे महत्त्व पटेल. जैव बहुविधतेची - प्राणी, पक्षी, वनस्पती यांच्या बहुविधतेची जपणूक करण्याचे महत्त्व आता लोकांना पटलेले आहे. शंभर वर्षांपूर्वी ही बहुविधता नष्ट होण्याची भीती जाणकारांना वाटत होती. जैव बहुविधतेने भौतिक आरोग्याचे रक्षण होते त्याप्रमाणे भाषिक बहुविधतेने मानसिक आरोग्याचे रक्षण होते. जग म्हणजे विविध दर्शनांची संरचना आहे आणि प्रत्येक दर्शन भाषेतच व्यक्त होते. त्यामुळे भाषेच्या मृत्युबरोबर तिच्यात व्यक्त झालेल्या दर्शनाचाही मृत्यू होतो. पुरेशा लोकांनी आवाज उठवला तर जगाला हे पटेल.

इंटरनेटचा शोध ही संज्ञापनातील तिसरी क्रांती आहे. इंटरनेट वाणीपेक्षा- बोलण्यापेक्षा - वेगळे आहे आणि लेखनापेक्षाही वेगळे आहे. कुणी म्हणेल ई-मेल, चॅटरूम यांत नवीन काय आहे ? आपण बोलतो तेव्हा आपल्याला तात्काळ प्रतिसाद मिळत असतो - तो शब्द, सूर, हुंकारादी इतर आवाज, हावभाव यांच्यामार्फत - ईमेल वा चॅटरुममध्ये ते शक्य नसते. दीर्घ ई-मेलला उत्तर लिहिताना एका ठिकाणचा मजकूर कापून दुसऱ्या ठिकाणी चिकटविणे हे साहजिक असते. पण प्रत्यक्ष संभाषणात ते शक्य नसते. चॅटरूममध्ये एकाच वेळी अनेक संभाषणे चालू असतात आणि त्या सगळ्यांत एकाच वेळी सहभागी होणे शक्य नसते. लिखित भाषा कायमस्वरूपी असते, तिच्यात बदल होत नाही. पण जगव्यापी जाळ्यात (वर्ल्ड वाइड वेबमध्ये) तसे नसते. ते गतिशील असते, सतत बदलत असते. तेथे तुम्हाला अनेक संदर्भ एकाच वेळी सुचवले जातात. त्यातल्या कुठल्याही संदर्भाकडे तुम्ही जाऊ शकता. हातातील पुस्तक वाचताना तसे होत नाही. म्हणून ही संज्ञापनातील तिसरी क्रांती आहे.

१९७०च्या दशकात अमेरिकेत इंटरनेट सुरू झाले तेव्हा त्याची भाषा शंभर टक्के इंग्लिश होती. १९९५मध्ये इंग्लिशचे प्रमाण ९५टक्के, १९९७मध्ये ८०टक्के

२०००मध्ये ७०टक्के आणि २००३मध्ये ५०टक्के इतके कमी झाले. आता या जगव्यापी जाळ्यात सुमारे दोन हजार भाषा आहेत. सुरवातीला रोमन लिपी वापरणाऱ्या भाषा जाळ्यात आल्या, हे साहजिक होते. पण आता चिनी, जपानी, देवनागरी भाषा जाळ्यात येत आहेत.

इंटरनेटचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे त्यावर अल्पसंख्याक भाषांना मिळणारा वाव. उदाहरणार्थ, वेल्श ही मृत होऊ लागलेली भाषा आता पुन्हा वाढत आहे. तिचे इंटरनेटवर समर्थ अस्तित्व आहे, तिच्या चॅटरूम आहेत, वेबसाइट्स आहेत.

कुठल्याही भाषेचे भवितव्य तरुण पिढीवर अवलंबून असते. आजच्या युवा पिढीच्या पोटीच उद्याची पिढी जन्माला येणार आहे. ते भाषेवर प्रेम करू लागले तर भाषा जिवंत राहील. आणि तरुणांना काय आवडते ? ई-मेल, चॅटरूम्स, त्रोटक संदेशांची देवाणघेवाण (एसएमएस) म्हणून भाषा जिवंत राहण्यासाठी ती इंटरनेटवर वापरली जाणे आवश्यक आहे.

(*ब्रिटिश कौन्सिलच्या पुणे ग्रंथालयाकडून डॉ. डेव्हिड क्रिस्टल यांच्या भाषणाची चित्रध्वनी तबकडी श्रीमती सुलभा सिधये यांच्या प्रयत्नामुळे उपलब्ध झाली.*)

प्र. ना. परांजपे

---

**मुखपृष्ठासंबंधी**

या अंकाच्या मुखपृष्ठासाठी पाणिनीची निवड केली आहे. तो संस्कृतचा आद्य व्याकरणकार. 'अष्टाध्यायी'च्या रचनेतील प्रगल्भता, परिपूर्णता, अल्पाक्षरता इ. वैशिष्ट्यांमुळे आधुनिक भाषा- वैज्ञानिकही चकित होतात. त्याच्या काळाबद्दल एकमत नसले तरी तो इसवी सन पूर्व पाचव्या शतकात होऊन गेला असे बहुसंख्य अभ्यासक मानतात. पाकिस्तानातील शलातुर (आताचे लाहुर) ह्या अटकेजवळील गावात त्याचा जन्म झाला. उच्चारशास्त्र, वर्णमाला, शब्दघटना यांच्या संबंधीचे शास्त्रीय सिद्धांत त्याने मांडले.

त्याच्या व्याकरणाचे चार भाग आहेत :

(१) शिवसूत्रे (स्वनिम विचार) (२) अष्टाध्यायी (रूपिम विचार)

(३) धातुपाठ (धातू व त्यांचे वर्ग) (४) गणपाठ (नामांची मूळ रूपे व त्यांचे वर्ग)

यापैकी 'अष्टाध्यायी' हे या व्याकरणाचे केंद्र आहे. धातू व नामांची मूळ रूपे यांपासून शब्द तयार करण्याचे नियम (सूत्रे) त्यात दिली आहेत. पाणिनी व त्याचे भाष्यकार पतंजली, कात्यायन व भर्तृहरी यांचा २०व्या शतकातील फेर्दिनांद द सोस्यूरपासून नोम चॉम्स्कीपर्यंतच्या अनेक भाषावैज्ञानिकांवर प्रभाव असल्याचे दिसून येते.

---










# विद्याव्रती पंडित - डॉ. वा. के. लेले

कल्याण काळे

चिरस्मृत प्राध्यापक डॉ. वा. के. लेले यांना कॅन्सरसारख्या दुर्धर आजाराने आपले लक्ष्य बनविले आणि १३ फेब्रुवारी २००७ रोजी त्यांचे दु:खद निधन झाले. एका सज्जन, सच्चरित्र, विद्याव्रती विद्वानाच्या आपल्या आसपासच्या अस्तित्वाला आपण मुकलो. डॉ. वा. के. लेले माझ्यापेक्षा चारपाच वर्षांनी मोठे असल्यामुळे त्यांच्याशी माझा दृढ म्हणता येईल असा स्नेह नसला तरी त्यांच्या विद्वत्तेबद्दल, त्यांच्या अखंड ज्ञानसाधनेबद्दल, त्यांच्या ग्रंथलेखनाबद्दल, माझ्या मनात अतिशय आदर होता. त्यांनाही माझ्याबद्दल आपुलकी वाटत होती.

शालेय आणि महाविद्यालयीन जीवनात ते एक अभ्यासू, हुशार विद्यार्थी म्हणून प्रसिद्ध होते. महाविद्यालयीन आणि विद्यापीठीय परीक्षांमध्ये ते सातत्याने प्रथमश्रेणीत उत्तीर्ण झाले. विशेष म्हणजे हे सर्व शिक्षण त्यांनी पूर्णवेळ नोकरी करून पूर्ण केले. एम.ए.परीक्षेत ते मराठी विषयातील अभिमानास्पद अशा न. चिं. केळकर सुवर्णपदकाचे मानकरी ठरले. त्यानंतर मुंबईच्या श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी विद्यापीठात मराठी, संस्कृत आणि सामान्य शिक्षणशास्त्र या विषयांचे अधिव्याख्याता म्हणून तीन वर्षे काम केल्यानंतर (१९५७ ते १९६१) त्यांना काशीला बनारस हिंदू विश्वविद्यालयात मराठी विभागात नोकरी मिळाली. तेथे त्यांनी दहा वर्षे नोकरी केली (१९६१-१९७१). परंतु पत्नीला तेथील हवामानाचा त्रास होऊ लागला म्हणून ते महाराष्ट्रात परत आले. जुन्नर येथील श्री शिवछत्रपती महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून एक वर्ष आणि त्यानंतर पुण्याच्या नेस वाडिया महाविद्यालयात मराठी विषयाचे प्रमुख म्हणून त्यांनी तीन वर्षे काम केले. १९७६मध्ये ते पुन्हा बनारस हिंदू विश्वविद्यालयात रुजू झाले. तेथे विभागप्रमुख, प्रोफेसर अशी मानाची पदे त्यांना मिळाली. १९९३मध्ये ते तेथून निवृत्त झाले आणि पुण्याला परत आले.

नोकरीतील बदलांचा त्यांच्या व्यासंगावर किंवा ग्रंथनिर्मितीवर यत्किंचितही परिणाम झाला नाही. त्यांचे जवळजवळ १२५ अभ्यासपूर्ण निबंध निरनिराळ्या








संशोधनपर नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले आहेत. त्यांनी इंग्रजी, मराठी आणि हिंदी या तीनही भाषांमध्ये ग्रंथरचना केली. ते मराठीचे प्राध्यापक होते. साहजिकच त्यांनी मराठीत सर्वात जास्त म्हणजे २५ ग्रंथ लिहिले. याशिवाय इंग्रजीमध्ये पाच आणि हिंदीमध्ये दोन असे एकूण ३२ ग्रंथ त्यांच्या नावावर आहेत. त्यापैकी ७ ग्रंथ लोकप्रिय विषयांवरचे असून २५ ग्रंथ त्यांच्या व्यासंगक्षेत्रातील आहेत. ते प्रामुख्याने संस्कृत पंडित होते. त्यांचा पीएच.डी.चा प्रबंध 'भारतीय काव्यशास्त्राची उत्क्रान्ती' हा होता. हा बृहत्काय प्रबंध त्यांनी डॉ. रा.शं. वाळिंबे यांच्या मार्गदर्शनाखाली खूप परिश्रम घेऊन सिद्ध केला आणि विद्यापीठाकडे मुद्रित स्वरूपातच सादर केला होता. त्याचे औपचारिक प्रकाशन पदवी मिळाल्यानंतर त्यांनी यथावकाश केले. संस्कृत साहित्यशास्त्राचा व्यासंग असल्याने क्षेमेन्द्र, भामह, वामन या आपल्या आवडत्या साहित्यशास्त्र्यांवर त्यांनी प्रत्येकी दोन ग्रंथ लिहिले. क्षेमेन्द्राच्या 'कविकण्ठाभरण'या ग्रंथाचे संपादन त्यांनी हिंदीतही प्रसिद्ध केले. त्यांच्या अभ्यासाचे खास क्षेत्र म्हणजे शैलीविज्ञान. त्यावर त्यांनी 'ललितलेखन व शैली' हा ग्रंथ लिहिला असून 'शाकुन्तलाचा शैलीशास्त्रीय अभ्यास' या ग्रंथात शैलीशास्त्राचे उपयोजन करून दाखवले आहे, यथामूल परिचय करून दिला आहे. मुळातील संकल्पना स्पष्ट व्हाव्यात म्हणून मराठी साहित्यातील भरपूर उदाहरणेही दिली आहेत. 'प्राचीन भारतीय काव्यशास्त्रातील शैली व शैलीशास्त्र' या विषयावर इंग्रजीतही एक ग्रथ लिहिण्याचा त्यांचा मनोदय होता.

त्यांच्या अभ्यासाचे आणखी एक महत्त्वाचे क्षेत्र म्हणजे संस्कृतमधील तन्त्रप्रयुक्त्यांचा अभ्यास हे होय. पाणिनी, कौटिल्य, चरक, सुश्रुत, वाग्भट, नीलमेघ इत्यादी प्राचीन विचारवंतांनी शास्त्रीय ग्रंथांच्या निर्मितीच्या व निर्वचनांच्या ज्या सुमारे सव्वाशे तंत्रयुक्त्या सांगितल्या आहेत त्यांचा त्यांनी मराठी, इंग्रजी वाचकांना प्रथमच परिचय करून दिला आहे. त्यांच्या भामहाच्या अभ्यासात या अभ्यासाचे प्रत्यन्तर मिळते. ज्ञानेश्वरीचा या तंत्रप्रयुक्त्यांच्या आधारे अभ्यास करून त्यांनी 'ज्ञानेश्वरीचा शास्त्रीय अभ्यास' हा ग्रंथ लिहिला. अगदी अलीकडे त्यांनी इंग्रजी भाषेचे महत्त्व ओळखून या भाषेतील 'मराठी इंग्रजी व्यावहारिक वाक्यकोश' हा महत्त्वाकांक्षी प्रकल्प हाती घेतला होता. इ.स. २००१ ते २००६या वर्षांत त्यांचे तीन भाग प्रसिद्ध झाले. तो त्यांचा अखेरचाच ग्रंथ ठरला.

डॉ. वा. के. लेले प्रसिद्धिपराङ्मुख राहून एकान्तात आपली ग्रंथनिर्मितीची साधना करीत राहिले तरी त्यांच्या विद्वत्तेचा सुगंध सगळीकडे दरवळत राहिला. याचा परिणाम म्हणून त्यांच्या अनेक ग्रंथांना प्रकाशनासाठी अनुदाने मिळाली. शासकीय, अशासकीय

पुरस्कार मिळत गेले. त्यांच्या प्रबंधाला सादर केलेल्या वर्षातील सर्वोत्कृष्ट प्रबंध म्हणून पुणे विद्यापीठाची य. वि. परांजपे पारितोषिक आणि न.चिं.केळकर पारितोषिक ही दोन पारितोषिके मिळाली. महाराष्ट्र राज्य शासनाचे एकूण चार वेळा ग्रंथ-निर्मिती पुरस्कार मिळाले. महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्थेची चार वेळा बक्षिसे मिळाली. मुंबई विद्यापीठाची दादोबा पांडुरंग तर्खडकर पारितोषिके दोन वेळा मिळाली. केन्द्र शासनाचे स्वतंत्र ग्रंथनिर्मितीचे पारितोषिक मिळाले. पुणे विद्यापीठाच्या ज्ञानदेव अध्यासन समितीचे सर्वोत्कृष्ट ग्रंथनिर्मितीचे पारितोषिक 'ज्ञानेश्वरीचा शास्त्रीय अभ्यास' या ग्रंथाला मिळाले. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे रा. श्री. जोग ग्रंथपारितोषिक 'शैलीशास्त्रज्ञ भामह' या ग्रंथाला मिळाले. बनारस हिंदू विश्वविद्यालयाने 'उत्कृष्ट शिक्षक' म्हणून त्यांचा सन्मान केला. व.दि. कुलकर्णी स्मारक समितीनेही त्यांचा पुरस्कार देऊन गौरव केला. असे अनेक महत्त्वाचे पुरस्कार आणि अनेक संस्थांचे सदस्यत्व त्यांना मिळाले. या त्यांच्या यशस्वी कर्तृत्वाबद्दल कोणालाही आदर वाटेल यात शंका नाही. त्याचबरोबर एक थोर चारित्र्यसंपन्न, तत्त्वनिष्ठ, उद्योगशील, सज्जन गृहस्थ म्हणूनही ते आदरणीय होते. त्यांच्या स्मृतीला सादर प्रणाम !

**त्यांचे काही महत्त्वाचे ग्रंथ**

१. औचित्यविचार आणि औचित्यविचार चर्चा(१९६६)प्रकाशक- मालती वामन लेले
२. भारतीय काव्यशास्त्राची उत्क्रान्ती (१९७०) प्रकाशक - मालती वामन लेले
३. काव्य, शास्त्र व संस्कृती (१९७६)
४. Doctrine of Tantrayuktis (१९८२) प्रकाशक - चौखंबा सुरभारती प्रकाशन, वाराणसी २२१००१
५. ललितवाङ्मय व शैली (१९८४) साहित्यप्रसार केंद्र, नागपूर १२
६. ज्ञानेश्वरीचा शास्त्रीय अभ्यास (१९८६) साहित्य प्रसार केंद्र, नागपूर १२
७. शैलीशास्त्रज्ञ भामह (१९९५) मानससन्मान प्रकाशन, पुणे ४
८. Bhamaha's Kavyalankara : (A Stylistic and Methodological Study) (१९९९) मानसन्मान प्रकाशन, पुणे
९. वाक्यकोश (भाग १ ते ३) - २००१ ते २००६ : राजहंस प्रकाशन, पुणे ३०
१०. भाषा : स्वरूप, सामर्थ्य व सौन्दर्य (२००५) राजहंस प्रकाशन, पुणे ३०.

■

ए-५ प्रज्ञानगड, नवश्या मारुती गल्ली, वीटभट्टी, सिंहगड रस्ता, पुणे 411030

# नवी भारतविद्या - एक प्रात्यक्षिक

विश्वनाथ खैरे

मीनाक्षीच्या मदुरैमधून तमिळनाडूची सर्वात दक्षिणेची वैगै नदी वाहते. तिच्या दक्षिण तीरावर तीन वीरगळ म्हणजे गोग्रहणाच्या चकमकीत कामी आलेल्या वीरांच्या स्मारकाचे दगड सापडले. एकावर, देवनागरीचे मूळ असलेल्या ब्राह्मी लिपीतला, तमिळ भाषेतला लेख मिळाला : ''कुडलूरच्या गोग्रहणातील (आकोल्) पेदु गावच्या तियन् आंडवनचा वीरगळ. (कल् पेदु तियन् आंडवन् कुडल ऊर् आकोल्)''. तज्ज्ञांच्या मते लेखाची लिपी इ.स.पूर्व दुसऱ्या शतकातली आहे. ('डीएलए न्यूज', मे २००६).

मराठीला त्या लेखातला आकोल् (गोग्रहण) शब्द गावांच्या नावांमधे ओळखीचा आहे. आकोला आकोली आकोले, अकोला अकोली अकोळे अकोळनेर अशा नावांची ४५ हून अधिक गावे महाराष्ट्राच्या १५ हून अधिक जिल्ह्यांमध्ये आहेत. 'मराठी लोकांची संस्कृति'मध्ये इरावती कर्व्यांनी याच नावांचा उल्लेख करून म्हटले होते, ''सर्व महाराष्ट्रभर, एवढेंच नव्हे तर गुजरातेंत नर्मदा नदीपर्यंत आढळणारी अंकोले-अकोले, अकोळनेर, अंकलेसर... हीं नावें कोणीं दिली ? देणारे लोक पूर्वेकडून पश्चिमेकडे किंवा उत्तरेकडून दक्षिणेकडे कीं उलट दिशेनें गेले वगैरे प्रश्न सर्व महाराष्ट्रीयन ग्रामनामांच्या अभ्यासानें सुटतील. पण ते नीट सुटण्यास तेलंगण, कर्नाटक, गुजरात व मध्य हिंदुस्थान येथील ग्रामनामांच्या अभ्यासाची जरुरी आहे. या अभ्यासांत पुण्याला प्रा. कत्र्यांसारखा विद्वान भाषापंडिताचें साह्य मला मिळत आहे हें सांगणें इष्ट आहे. दुर्दैवानें अभ्यास अद्याप अपूर्ण असल्यामुळें सध्या वरील प्रश्नांचीं उत्तरें देणें अशक्य आहे.'' (पृ. २३१).

या ग्रामनामांपुरते तरी या प्रश्नाचे उत्तर पुरेसे स्पष्ट आहे. आकोल हा शब्द 'तोल्काप्पियम्' या सर्वात जुन्या तमिळ भाषा-साहित्यविषयक ग्रंथात नमूद आहे आणि इ.स.पूर्व दुसऱ्या शतकात तो प्रचलित होता हे वीरगळावरून स्पष्ट झाले आहे.

गाईंना पळवून आणणारे किंवा तशांना पळवून लावणारे यांच्या संबंधातली 'चोराची उंडवडी, गवळ्याची उंडवडी' अशा नावांची गावे महाराष्ट्रात आहेत हे मी

पूर्वीच दाखवले आहे. ('द्रविड महाराष्ट्र', १९७७). ही गोग्रहणाची चाल महाभारततही नमूद आहे. विराटाच्या गाई पळवून नेणाऱ्या कौरवांनाच अर्जुनाने पळवून लावले ही महाभारतातली कथा प्रसिद्धच आहे. महाभारताच्या कवीने आपल्या परिसरातल्या त्या प्रकारच्या चकमकींवरून तसलीच एक चकमक कौरवपांडवांच्यात घडविली.

अशा रीतीने 'आकोल'मध्ये भारतीय भाषा-संस्कृतींची एकात्मता दिसून येते. ती इथेच थांबत नाही. नगर जिल्ह्यातील आकोला हे तालुक्याचे गाव प्रवरेच्या खोऱ्यात डोंगराच्या कुशीतच वसलेले आहे. नावावरून वाटते तशी गोग्रहणाच्या खेळीला ती योग्य जागा आहे. या आकोल्यात एक आगळेवेगळे देऊळ आहे - अगस्तीचे. वेदात, रामायण-महाभारतात अगस्त्यमुनी आहेतच; पण अगस्ति मुनीने तमिळचे आद्य व्याकरण लिहिले अशीही परंपरा आहे. तसा तमिळ 'अगत्ति' म्हणजे गृहस्थ. मराठीत आपण 'अगत्य' ही गृहस्थपणाची खूण मानतोच. आकोल्यातल्या या देवळात जुन्या काळापासूनचा अगस्तीचा तांदळा आहे. तांदळा म्हणजे तांदळाच्या दाण्याच्या आकाराचा वरवंट्यासारखा पण टोकवाला दगड. काही वर्षांपूर्वी मंदिर नवे बांधले, त्यात नवी जयपुरी मूर्तीही आली, तरी लोकांनी हा तांदळा देवळात ठेवायलाच लावला, असे हे महाराष्ट्रात नांदलेल्या प्राचीन संस्कृतीचे निदर्शक देऊळ.

रामायणात म्हटले आहे की रामसीता अगस्त्यमुनींच्या आश्रमात गेली तेव्हा रामाने त्यांना म्हटले, ''पाणी आणि वनराई भरपूर आहे असा देश मला सांगा. तिथे आश्रम करून सुखाने राहीन.'' मुनींनी क्षणभर विचार करून रामाला सांगितले, ''इथून दोन योजनांवर फळे, मुळे, पाणी भरपूर असलेला, पुष्कळ हरणांचा, पंचवटी नावाचा समृद्ध देश आहे. तो नावाजण्यासारखा, फार दूर नसलेला, गोदावरीच्या समीप आहे. सीतेला तिथे करमून जाईल.'' (किं तु व्यादिश मे देशं सोदकं बहुकाननम्। यत्राश्रमपदं कृत्वा वसेयं निरतः सुखम् ।११। इतो द्वियोजने तात बहुमूलफलोदकः। देशो बहुमृगः श्रीमान् पंचवट्यभिविश्रुतः ।१३। स देशः श्लाघनीयश्च नातिदूरे च राघव । गोदावर्याः समीपे च मैथिली तत्र रंस्यते ।१८। (वा.रा. अरण्यकांड १३वा सर्ग) अगस्त्यमुनी हे पार दक्षिणेतले असे मानले तर पंचवटी अगस्त्याश्रमाच्या इतकी जवळ नसती. त्यामुळे कवीने अगस्तीच्या आकोल्यातील स्थानाचाच येथे उल्लेख केला असे म्हणता येते.

येथे आपण भाषेपासून सुरवात केली. तमिळ आणि मराठी यांच्यातले शब्दसाम्य किती प्राचीन आहे हे महाराष्ट्रातल्या गावांच्या नावांवरून दाखवले. त्यांतल्या एका गावात, तमिळनाडूत वंदनीय असलेल्या वैदिक मुनीचे प्राचीन स्थान आहे हा

लोकसंस्कृतींच्या एकात्मतेचा पुरावा. त्या एकात्मतेचे (प्रचलित मतानुसारच्या संघर्षांचे नव्हे) एक प्रतीक अशा या मुनीच्या प्राचीन समाजांतल्या कथा संस्कृत कवींनी महाकाव्यांत आणि पुराणांत ग्रथित केल्या. रामायणात आलेल्या एका कथेचा महाराष्ट्रातल्या गावांशी असलेला अनुबंधही दाखवला. भाषा, कथा आणि संस्कृती यांचा असा अनेकविद विचार करते ती नवी भारतविद्या. ■

३७४, सिंध सोसायटी, पुणे 411007

**श्रद्धांजली**

कादंबरीकार श्री. ना. पेंडसे यांचे २३ मार्च २००७ रोजी वयाच्या ९४व्या वर्षी निधन झाले. २०व्या शतकाच्या उत्तरार्धातील मराठी कादंबरीचा मानदंड त्यांनी निर्माण केला. 'मराठी अभ्यास परिषद' व 'भाषा आणि जीवन' यांची त्यांना विनम्र श्रद्धांजली.

—संपादक

**पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन**

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्या संबंधी वृत्तपत्रे आणि पुस्तकनोंदणी अधिनियम, कलम डी १९(बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४, यांना अनुसरून केलेले निवेदन.

१) प्रकाशन स्थळ : पुणे, महाराष्ट्र

२) प्रकाशनाची कालनियतता : त्रैमासिक : जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी).

३) प्रकाशक व मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : नीलिमा गुंडी, भारतीय, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र.५, पुणे ४११ ००२.

४) मुद्रणस्थळ : भंडारी मुद्रणालय, आनंदनगर, सिंहगड मार्ग, पुणे ४११०५१.

६) संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : प्र.ना. परांजपे, भारतीय, सी-१, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११ ००७.

मी, नीलिमा गुंडी, असे प्रतिज्ञापूर्वक सांगते की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

नीलिमा गुंडी (प्रकाशक)

# भाषा शिक्षणाचा 'मूलगामी' विचार

रमेश पानसे

आपले भाषा शिक्षणाबाबतचे काही प्रश्न आहेत. साक्षरी-शालेय शिक्षणाचे माध्यम म्हणून कोणती भाषा असावी, हा प्रश्न तर गेली दीडशे वर्षे चर्चेत आहे. मराठी मुले शालांत परीक्षेत, मराठी भाषा या विषयात मोठ्या संख्येने नापास होऊ लागली आहेत हा अगदी अलीकडचा प्रश्न आहे. मराठी मुलांची शिक्षणप्राप्तीनंतरही मराठी भाषेतील अभिव्यक्ती समाधानकारक नसते हा प्रश्न, गेली अनेक वर्षे सार्वत्रिकरीत्या अनुभवास येत आहे. तर शुद्ध भाषा वापराचा, स्पष्ट शब्दोचारांचा, चांगल्या अक्षराचा, योग्य वयात वाचायला-लिहायला शिकण्याचा, नीटस भाषाभिव्यक्तीचा असे अनेक अभावरूपी प्रश्न आपल्या शालेय शिक्षणाला जळवेसारखे चिकटून राहिले आहेत. एकूण शिक्षणाचेच रक्तशोषण ते करीत आहेत.

शाळेतील भाषा शिक्षणाविषयीची आपली काही निश्चित अशी कल्पना आहे. भाषा ही इतर विषयांप्रमाणेच – चढत्या अंगाने शिकविली पाहिजे याविषयी संबंधितांच्या मनांमध्ये स्पष्टता आहे. शालेय शिक्षण हे अभ्यासक्रमांच्या नि त्यांवर आधारित अशा क्रमिक पुस्तकांच्या माध्यमांतून केले जात असल्यामुळे, भाषा शिक्षण कोणत्या इयत्तेमध्ये किती द्यायचे याची नेटकी आखणी केली जाते. भाषा शिकविण्याच्या काही पद्धती प्रशिक्षणांतून शिक्षकांना शिकविल्या जातात. शिक्षकांनी त्या आत्मसात करून वर्गांतील शिक्षणात अंमलात आणाव्यात अशी अपेक्षाही धरली जाते. शिक्षक ते तसेच करीत असावेत, असे मला वाटते. सारे असे शास्त्रशुद्ध, नियमबद्ध करूनही, शालेय वयातले भाषाशिक्षण, अपुरे राहते, असमाधानकारक होते, दुर्लक्षित राहते आणि संपन्न भाषाप्राप्तीमुळे येणारा आत्मविश्वास आणि मिळणारा आनंद यांपासून बहुसंख्य विद्यार्थी कित्येक योजने दूरच राहताहेत, ही प्राधान्य देऊन गंभीरपणे विचारात घ्यावी अशी बाब आहे, असे मला वाटते.

भाषा शिक्षणाच्या विचाराची दिशा बदलून पाहू या. वृक्षखोडाचे तुकडे करताना एकाच बाजूने कुऱ्हाडीचे घाव घालत बसल्यास, श्रम आणि वेळ दोन्हीही जास्त खर्च

होतात. खोडाला जमिनीवरच वळवून दुसऱ्या बाजूने घाव घालणे अधिक श्रेयस्कर. आपण तसेच करू या.

मुलांचे भाषाशिक्षण चांगले झाले पाहिजे. भाषा शिकवणे म्हणजे काय हे आपल्याला कळते आहे, भाषेचे मोठे संचित, केवढेतरी वाङ्मय उपलब्ध आहे. त्याचा वापर करून आपण मुलांना भाषा, वाढत्या प्रमाणात शिकवू पाहतो. गरजेनुसार नि कालोचित असे बदल अभ्यासक्रमांत आणि त्या अनुषंगाने क्रमिक पुस्तकांत आपण, वेळोवेळी करीत जातो. या प्रचलित पद्धतीने मुलांचे भाषाशिक्षण करणे याला मी 'बाह्यदृष्टी'ने भाषा शिक्षण करणे असे म्हणतो. मुलाला काय द्यायचे आहे हे आपण ठरवतो, याला मी भाषाशिक्षणाची बाह्यदृष्टी असे संबोधतो. भाषा शिक्षणाच्या विचाराची दिशा बदलणे म्हणजे या 'बाह्यदृष्टी'कडून 'अंतर्गतदृष्टी'कडे वळणे होय.

आपण भाषाशिक्षणाचा 'मूलगामी' विचार करूया. येथे 'मूलगामी' हा शब्द मी दोन अर्थांनी वापरीत आहे. एक, मूलगामी म्हणजे मूळशोधन करणे; मुळापर्यंत जाऊन शोध घेणे. मूलगामी याचा दुसरा अर्थ असा की, (शाळेमधून शिकू पाहणाऱ्या) मुला-मुलींपर्यंत जाऊन शोध घेणे. 'मूल'गामी शोध घ्यावयाचा तर मूल समजावून घेणे, निसर्गतः मूल भाषा ग्रहण कसे करते हे समजावून घेणे होय. हेच शिक्षणाच्या प्रचलित परिभाषेत मांडायचे तर असे म्हणता येईल की, भाषा शिक्षणाचा 'शिकविण्या'च्या अंगाने विचार न करता, तो 'शिकण्या'च्या अंगाने करणे. यालाच, विचाराची दिशा बदलून भाषाशिक्षणाचा विचार करणे, असे आपण म्हणतोय.

अगदी अलीकडे झालेल्या मेंदूविषयक संशोधनातून मेंदू या मानवी अवयवाची बऱ्याच प्रमाणांत उकल झाली आहे. मेंदूची अंतर्गत रचना आणि मेंदूची कार्यपद्धती यांवर बऱ्यापैकी प्रकाश पडला आहे. त्यावरून मेंदू हा माणसाचा 'शिकण्या'चा अवयव आहे असे समजले आहे. माणसाचे शिकण्याचे सारेच कार्य मेंदूकडून होत असल्यामुळे, भाषा शिकण्याच्या कार्याचाही तोच कर्ता आहे असे म्हणता येईल. भाषा शिक्षणासाठी मेंदूमध्ये असलेली रचना आणि भाषा शिक्षणाची मेंदूमध्ये घडून येणारी प्रक्रिया समजावून घेतली तर भाषाशिक्षणाचे 'मूळ'शोधन आणि 'मूल'शोधन अशा दोन्हीही गोष्टी साध्य होतील.

मुलाच्या मेंदूघडणीची प्रक्रिया ही तीन पायऱ्यांतून जाते. मेंदूमध्ये अक्षरशः अब्जावधी पेशी असतात. यांना मज्जापेशी असे म्हणतात. या मज्जापेशींची निर्मिती, मज्जापेशींचे मेंदूमधील (आपापल्या गटांचे) स्थानग्रहण आणि या पेशींची परस्परबांधणी अशा मेंदूघडणीचा तीन पायऱ्या असतात. यांपैकी पहिल्या दोन पायऱ्यांचे कार्य बालकाच्या जन्मापूर्वीच पूर्ण झालेले असते. परंतु तिसरे, म्हणजे

मेंदूमधील पेशींचे परस्परजुळणीचे कार्य मात्र जन्मापूर्वी गर्भाशयात असताना, अत्यंत अल्प प्रमाणात झालेले असते. बहुतांशी सर्वच जुळणीचे कार्य जन्मानंतर होत जाते आणि ते जवळजवळ आठव्या वर्षापर्यंत चालू असते. प्रामुख्याने या तिसऱ्या पायरीचा आणि बालकाच्या शिक्षणाचा घनिष्ठ संबंध असतो.

माणसाच्या विविध अशा शारीरिक नि बौद्धिक क्षमतांची निर्मिती आणि वृद्धी ही मज्जापेशींच्या परस्पर जुळणीवर अवलंबून असते; आणि ही पेशींची जुळणी बालकाला मिळणाऱ्या विविधांगी अनुभवांवर अवलंबून असते. त्यामुळे बालकांच्या आठ वर्षांपर्यंतच्या वयाला 'मेंदूघडणीचे वय' असे रास्तपणे संबोधता येते; आणि हे अनुभवाधारित शिक्षणाचे वय मानले जाते.

भाषेच्या संदर्भातली विविध कार्ये करणारी केंद्रे मेंदूमध्ये असतात. ती कुठे कुठे आहेत, आणि ती आपापली कार्ये कशी करतात याची आता चांगली माहिती उपलब्ध झाली आहे. मेंदूचा नवबाह्यक (निओ कॉर्टेक्स) नावाचा जो सर्वांत वरचा पदर असतो, त्यात ही भाषेशी संबंधित अशी केंद्रे असतात. ही सर्व केंद्रे प्रामुख्याने मेंदूच्या डाव्या भागात असतात. भाषा-निर्मितीचे नि तिची बोलून अभिव्यक्ती करण्याचे केंद्र हे 'ब्रोका क्षेत्र', म्हणून ओळखले जाते आणि ते डाव्या डोळ्याच्या वर ललाट पालीमध्ये (फ्रंटल लोब) मागच्या बाजूस वसलेले असते. अर्थातच भाषा मुखातून बाहेर पडण्यासाठी कार्यरत होणारे स्नायू असतात त्यांचे नियंत्रण करणारी केंद्रे जिथे असतात त्याच्याच जवळ हे ब्रोका केंद्र असते. दुसऱ्यांनी बोललेल्या भाषेच्या आकलनाचे केंद्र 'वर्निक क्षेत्र' हे डाव्या कानाच्या वर शंखपालीमध्ये (टेंपोरल लोब) असते. या केंद्रातील भाषा-आकलनाचे काम होण्यापूर्वी, भाषा ऐकली जावी लागते अथवा ती पाहिली जावी लागते. त्यामुळे साहजिकच हे केंद्र भाषा ऐकण्याच्या शंखपालीमधील (टेंपोरल लोब) आणि पाहण्याच्या पश्चकरोटी पालीतील (ऑसिपेटल लोब) केंद्रांच्या नजिक वसलेले असते. अलीकडेच, भाषाशिक्षणाशी संबंधित अशा, पर्श्विकापाली (पेरिएटल लोब)मधील आणखी एका केंद्राचा शोध लागला आहे. हे केंद्र 'गेशविंडक्षेत्र' म्हणून ओळखले जाते. या केंद्राकरवी ब्रोकाकेंद्र आणि वर्निक केंद्र यांना जोडले जाते. या सर्वच केंद्रांमधील पेशी (न्यूरॉन्स) त्यांच्या त्यांच्या तंतूंद्वारे (ॲक्झॉन्स व डॅंड्राईट्स) एकमेकांना जोडलेल्या असतात, आणि त्यामुळे परस्परांमध्ये संदेशवहनाचे काम होऊन सर्व केंद्रे आवश्यकतेनुसार कार्यरत होतात. वर्निक केंद्राचे काम थोडे आधी सुरू होऊन, लगोलग ब्रोकाकेंद्र कार्यरत होते. त्यामुळे लहान मुले भाषा बोलू लागण्यापूर्वी, काही प्रमाणात, भाषा समजू लागलेली असतात. गेशविंड केंद्र मात्र उशिरा परिपक्व होते; हे केंद्र भाषेच्या लिहिण्या-वाचण्याशी संबंधित असते.

या साऱ्या माहितीचा आशय असे सांगतो, की आजवर आपण ज्या 'बाह्यदृष्टी'ने शालेय भाषाशिक्षणाचा विचार करीत होतो, ती एकांगी दृष्टी होती; म्हणून अपुरीही होती. तिला परिपूर्णता आणायची असेल तर, बालकाच्या उपजत अशा भाषा शिक्षणक्षमतांचा विचार समाविष्ट करणारी अशी 'अंतर्गत दृष्टी', भाषाशिक्षणाच्या उपयोजनासाठी आवश्यक मानली पाहिजे. या 'अंतर्गत दृष्टी'चा निष्कर्षात्मक तात्त्विक नि व्यावहारिक आशय अशा प्रकारचा आहे :

एक, बालकाच्या मेंदूमध्ये भाषाशिक्षणाशी संबंधित अशी बौद्धिक व शारीरिक केंद्रे असतात; विशिष्ट वयात ती सजग होतात. आपला त्या त्या वयातील सारा भाषा-व्यवहार हा या केंद्रविकासाशी सुसंगत असा असावा लागतो. उदाहरणार्थ, लहान वयात काही भाषिक अनुभवच प्राप्त झाले नाहीत तर ही केंद्रे कायमची कमजोर राहून भविष्यातील भाषा-व्यवहारांत अडचणी उद्भवतात. दहा वर्षांपर्यंतचे वय हे प्रामुख्याने भाषाशिक्षणाचे आणीबाणीचे (क्रिटिकल) वय असते. याला मज्जाशास्त्रातील तांत्रिक भाषेत 'संधीचे गवाक्ष' (विंडो ऑफ ऑपॉरच्युनिटीज्) असे म्हणतात. याचा अर्थ असा की, हे वय भाषा शिक्षणासाठी, आयुष्यातील इतर कोणत्याही वयापेक्षा सर्वोत्तम संधी पुरविणारे असे असते. भाषा शिकण्याची सहजता, भाषा सर्वांगाने आकलन करण्याची क्षमता, विविध भाषांमधील अनेक स्वर आत्मसात करण्याची ताकद, अफाट शब्दसंग्रह जमविण्याची ताकद, शब्दांना विशिष्ट भाषेतील व्याकरणात बसविण्याचे कसब, आपल्याला सुचणारे विचार आणि कल्पना भाषेच्या विशिष्ट धाटणीत बसवून अभिव्यक्त करण्याची क्षमता आणि एकाच वेळेस दोन अथवा अधिक भाषांचे घट्ट वातावरण घरी वा दारी असेल तर प्रत्येक भाषेची स्वर-व्यंजन-व्याकरणाची वैशिष्ट्ये वेगवेगळी आत्मसात करण्याची तसेच त्यांची स्वतंत्रपणे सुसंगत अभिव्यक्ती करण्याची क्षमता, या गोष्टी, इतर कोणत्याही वयापेक्षा या वयात अधिक असतात; अधिक प्रभावी असतात; कमी कष्टदायक आणि अल्पकालखर्ची अशा असतात. एकाच वाक्यात सांगायचे तर बालकाचे दहा वर्षापर्यंतचे वय हे सर्वांगांनी भाषा फुलवण्याचे सर्वोत्तम वय असते. त्यामुळे हा काल अधिकाधिक प्रमाणांत बालकाच्या भाषाशिक्षणासाठी वापरला गेला पाहिजे.

दोन, भाषाशिक्षणाची मेंदूमान्य अशी एकमेव पद्धत आहे; ती म्हणजे 'करून शिकण्या'ची. भाषेसंबंधित मेंदूमधील सर्व केंद्रांना, त्यांच्या त्यांच्या आयुष्यभरच्या कामासाठी सजग करण्याचे नि सक्षम करण्याचे कार्य ज्या विशिष्ट कामांसाठी करावयाचे, ती कामे प्रत्यक्षात करूनच ही केंद्रे सबल होत असतात. म्हणजे असे की मेंदूला जी काही भाषिक कार्ये आयुष्यभर करायची असतात. ती करण्याच्या प्रत्यक्ष

प्रयत्नांतूनच, ती कार्ये करण्याचे सामर्थ्य मेंदूला प्राप्त होत असते. उदाहरणार्थ, आपल्याला भाषा बोलायची असते; तर बोलण्याच्या सरावातूनच भाषा बोलण्याचे मेंदूमधील ब्रोकाक्षेत्र विकसीत होते. भाषा समजावून घेण्याचे कार्य वर्निकक्षेत्र आणि त्याच्याच जवळचे अँग्युलर गायरसक्षेत्र करीत असेल तर या कामाची तालीम त्यांना देऊनच ती क्षेत्रे कायमच्यासाठी सक्षम होतात. त्यांच्या कार्याला वेग येऊ लागतो.

तीन, निसर्गतः भाषाशिक्षण कसे होते याचाही एक विकासपथ (ट्रॅजेक्टरी) मांडता येतो. तो मेंदूविकासाशी संलग्न करून मांडता येतो. उदाहरणार्थ, भाषा 'बोलणे' या एकाच गोष्टीचा जरी विचार केला तरी, वयाच्या सहाव्या ते आठव्या महिन्यांत स्वरोचाराला सुरुवात होते; दहाव्या ते बाराव्या महिन्यांत एक-शब्दी भाषा आणि एक ते दोन वर्षांपर्यंतच्या अवधीत द्वि-शब्दी भाषा मुले आत्मसात करीत असतात. बोबड्या बोलांच्या कालावधीत 'अडगुलं मडगुलं'सारख्या बडबड गीतांना, बालकाच्या या कालातील नैसर्गिक विकासाला पूरक म्हणून अनिवार्य महत्त्व असते. बालशिक्षणाच्या क्षेत्रातील दिग्गजांनी या दिशेने बरीच शास्त्रशुद्ध निर्मिती करून ठेवली आहे. दोन ते साडेतीन हा वयोकाल भाषा शिक्षणाचा सर्वांत वेगवान काल असतो. शब्दांच्या अर्थांचे आकलन, अर्थपूर्ण वाक्यरचना करता येणे, व्याकरणशुद्ध बोलता येणे या साऱ्या क्षमतांच्या विकासाचा हा कालावधी असतो. अफाट शब्दसंग्रहाचे संचित मुले या वयात प्राप्त करीत असतात. शब्द ऐकणे, शब्द बोलणे, शब्दांचे अर्थ शोधणे या साऱ्या क्रिया प्रभावी रीतीने करण्याचा हा कालावधी असतो. भाषा उदंड ऐकण्याचा नि भरपूर बडबड करण्याचा सराव देणे हे या काळातील भाषाशिक्षण असते. वयाच्या दुसऱ्या वयाला जेमतेम बोलू लागलेले बालक वयाच्या साडेतीन वर्षांपर्यंत चांगलेच 'भाषाप्रभू' झालेले असते. हा जेमतेम दीड वर्षांचा काळ भाषा शिक्षणाचा सर्वोच्च काळ असल्यामुळे, या काळातील मेंदू-अभिमुख शिक्षणात, भाषा ऐकण्या-बोलण्याचे, टप्प्याटप्प्याने ठरविलेले असे भरगच्च उपक्रम असावे लागतात.

पुढे दहा वर्षांपर्यंतचा काळ हा मुलांच्या दृष्टीने 'भाषा-समृद्धीचा काळ' असतो. भाषा बोलणे, भाषा ऐकणे, भाषा पाहणे, पाहिलेली–ऐकलेली भाषा बोलणे, तिचे अर्थ लक्षात घेऊन कृती करणे, भाषेकरवी कल्पना करणे, मूर्त गोष्टींचा अमूर्त पातळीवर विचार करता येणे, शारीरिक-कृतींशी संबंधित विनोदांकडून भाषिक नि विसंगतींमधून निर्माण होणाऱ्या विनोदांचा आनंद घेण्यापर्यंत मजल मारणे, विविध शास्त्रांमधील तांत्रिक भाषेची काही प्रमाणात समज येणे, आणि आपल्याला ज्याची ज्याची समज आली आहे त्या बाबी सुसंगतपणे बोलण्या-लिहिण्यातून व्यक्त करणे, अशा कितीतरी क्षमतांवर या वयातच मुले प्रभुत्व प्राप्त करतात.

दोन ते दहा वर्षांपर्यंतचा कालावधी हा तसा मोठा कालावधी आहे. हा बालकांच्या भाषाशिक्षणाचा कालावधी म्हणून ओळखला गेला पाहिजे. या काळात विकसीत होत जाणाऱ्या प्रत्येक क्षमतेचा विकासपथ मांडून, त्यासाठी उपयुक्त उपक्रमांचे उपयोजन करायला हवे; पण याहीपेक्षा अधिक महत्त्वाचे म्हणजे, या वयातील मुले आपली मेंदूमधील केंद्रे, बऱ्याचदा स्वतंत्रपणे न वापरता, सर्वच केंद्रे परस्परांच्या सहकार्याने एकत्रितरित्या वापरीत असतात. म्हणजे अशाप्रकारच्या सर्व क्षमतांना कवेत घेतील असे उपक्रम, परस्परसंबंधित असे उपक्रम, जाणीवपूर्वक आखून अंमलात आणावे लागतात. विविधांगी उपक्रमांचा एकसंध कार्यक्रम अंमलात आणावा लागतो.

मेंदू-संशोधनातून पुढे आलेला आणखी एक आशय आपण लक्षात घ्यायला हवा. बालकांचा दहा वर्षांपर्यंतचा कालावधी हा भाषेच्या सहज शिक्षणाचा कालावधी असतो. निदान एक तरी भाषा, तिच्या आयुष्यभरच्या सर्व उपयोगांसाठी किंवा कार्यांसाठी समृद्ध करण्याचा जसा हा काल असतो, तसाच तो एकापेक्षा जास्त भाषा सहजपणे आत्मसात करण्याचाही काल असतो. मेंदूसंशोधक, मज्जामानसशास्त्रज्ञ असे सांगतात की, जगामधील शेकडो भाषांमध्ये, एकत्रितरित्या पाहिले असता, सुमारे शंभर स्वर असतात, आणि बालकाची या वयात, मेंदूमध्ये जी पेशींची जुळणी चाललेली असते, तिच्यात हे सर्वच्या सर्व स्वर आत्मसात करण्याची नैसर्गिक क्षमता असते. नोम चॉम्स्की यांनी दाखवून दिल्याप्रमाणे सर्वच भाषांचे व्याकरण आत्मसात करण्याची मेंदूमध्ये उपजतच व्यवस्था असते. ही वैश्विक व्याकरणक्षमता जेवढी वापरात येते तेवढीच टिकून राहते. जिचा या वयात वापरच होत नाही ती क्षमता, तिच्यासाठीच्या जन्म पावलेल्या पेशी मृत होऊन, लयाला जाते. जे स्वर बालकाच्या परिसरातील भाषेतून बालकाच्या सतत कानांवर पडतात, जे वेळोवेळी बोलून पाहण्याची संधी उपलब्ध होते, ते स्वर उच्चारण्याची क्षमता टिकून राहते नि सरावाने वृद्धिंगत होते. तर याउलट, जे स्वर कधी ऐकायलाच मिळत नाहीत, ज्यांचा भाषिक उपयोगच माहीत होत नाही, असे स्वर उच्चारण्याची क्षमता सजग होण्यापूर्वीच मृत होते. बालकाच्या जन्मक्षणापर्यंत अनेक मज्जापेशी जन्माला आलेल्याच असतात. (प्रौढाच्या मेंदूत असलेल्या पेशींच्या संख्येच्या दुप्पट संख्येहूनही जास्त संख्या या पेशींची असते.) त्यापैकी ज्या पेशींना कामाची अजिबातच संधी मिळत नाही त्या मृत होतात. या प्रक्रियेला मज्जाशास्त्रीय तांत्रिक भाषेतही 'काटछाट करणे' (प्रूनिंग) असे म्हणतात.

या मेंदूविषयक माहितीचा संबंध, एकाच वेळी एकापेक्षा जास्त भाषा शिकण्याशी आहे. तसे साहाय्यक वातावरण उपलब्ध असले तर मुले जास्त भाषा आत्मसात करू शकतात. या बालवयाचा फायदा असा, की मुले त्या भाषा सहजपणे आत्मसात

करतात. ज्या मुलांच्या घरात, आई आणि बाबा वेगवेगळ्या भाषा बोलतात, त्या घरची मुले दोन्ही भाषा आपल्या 'मातृ(पितृ?) भाषा' म्हणून आत्मसात करतात. एवढेच नव्हे तर अक्कलहुशारीने आईशी आईच्या भाषेत आणि वडिलांशी वडिलांच्या भाषेत बोलतात. अशी भाषांची (गल्लत न करता) विभागणी करण्याची क्षमताही मेंदूमध्ये उपजत असते. अशाच प्रकारचा अनुभव आपल्याला, दोन राज्यांच्या सीमाप्रदेशांत राहणाऱ्यांबाबतही येतो. परराज्यांत किंवा परदेशांत स्थायिक झालेल्या कुटुंबांतील मुले आपल्या मूळ भाषेबरोबरच इतरही भाषा त्वरेने आत्मसात करतात.

हे विवेचन वाचताना, एका गोष्टीबद्दल मात्र सावध राहण्याची गरज आहे. मुले आपल्या लहान वयात एकापेक्षा अधिक भाषा सहजतेने आत्मसात करू शकतात याचा अर्थ असा नव्हे, की मुलांना अनेक भाषा 'शिकवाव्यात'. मुलांना नवीन भाषा शिकविणे आणि मुलांनी आपसूक नवीन भाषा शिकणे या दोन गोष्टी मूलतः भिन्न आहेत. विशेषतः ज्या तऱ्हेची भाषा शिकविण्याविषयीची संकल्पना आपल्या शालेय शिक्षणात प्रचलित आहे, त्याविषयी, मी येथे सावधगिरीची सूचना देत आहे. आपण जेव्हा भाषा 'शिकवितो' तेव्हा ती एका भाषेकरवी दुसरी भाषा शिकण्याची गोष्ट असते. त्यासाठी अर्थातच दुसरी भाषा शिकता येईल एवढी पहिली भाषा चांगली येत असावी लागते. आपल्या शालेय स्तरावरील मराठी विद्यार्थ्यांना, इंग्रजी अनेक वर्षे 'शिकवून'ही येत नाही, या समस्येचे उत्तर वरील विधानात दडलेले आहे. तसेच एक भाषा समृद्ध असेल तर दुसरी भाषा केव्हाही जरुरीपुरती शिकता येते; हाही अनेकांचा अनुभव आहेच. त्यामुळे शाळेतल्या मुलांसाठी इंग्रजी भाषेचे क्रमिक पुस्तक तयार करून, त्याच्या(च) आधारे इंग्रजी शिकविण्याचा खटाटोप हा तसा व्यर्थच जाणारा आहे. ज्या पद्धतींनी पाचवी ते दहावी अशी सहा वर्षे क्रमिक पुस्तकाधारित इंग्रजी शिकविली जाते त्याच पद्धतीने पहिली ते चौथी अशी आणखी चार वर्षे इंग्रजी शिकविल्याने, इंग्रजी येण्याच्या बाबतीत काही फरक पडेल असे वाटत नाही.

आजच्या विद्यार्थ्यांच्या भाषा-शिक्षणाविषयीचे माझ्या डोळ्यांसमोर एक विशिष्ट चित्र आहे. एकीकडे मेंदू-संशोधनाचा निष्कर्ष आणि दुसरीकडे शिकत्या पिढीची उद्याच्या जीवनाची गरज यांची सांगड घालून विद्यार्थ्यांच्या भाषाशिक्षणाचा नवविचार समोर ठेवता येईल. मेंदू-संशोधनाचा संदर्भित असलेला निष्कर्ष असा आहे, की साधारणपणे दहा वर्षांपर्यंतच्या वयात मुले वातावरणात – नजिकच्या परिसरात – असणाऱ्या भाषा आपणहून सहजपणे आत्मसात करतात. त्या त्या भाषांमधील सर्व खास स्वर, चढ-उतारांच्या लकबींससह शिकण्याची क्षमता – म्हणजे तशातऱ्हेची मेंदूमधील पेशींची रचना – उपजत असते. क्षमतारूपी वैश्विक व्याकरणरचना आणि








त्या व्याकरणात शब्द बसविण्याची क्षमताही त्यांच्या मेंदूमध्ये असते. असे जय्यत तयारीनिशी मूल जर का भाषाशिक्षणाला सामोरे जाणारे असेल, आणि बालकाची गरज मूळ भाषेबरोबरच दुसरी किंवा तिसरी भाषा शिकण्याची असेल, तर आपल्यापुढे दोन पर्याय उपलब्ध आहेत. एक पर्याय असा की, मुलाला किंवा मुलीला जेथे असे दोन-तीन भाषांचे वातावरण आयतेच उपलब्ध आहे, अशा ठिकाणी नेऊन ठेवणे व त्याकरवी तेथील हवेत असणाऱ्या संधींचा लाभ घेऊ देणे. अर्थातच हा पर्याय व्यवहारात अनेकांच्या गैरसोयीचाच आहे आणि म्हणून तो बहुतांशी त्याज्य ठरेल. जी मुले मुळातच अशा प्रदेशांत वास्तव्य करून आहेत, त्यांच्या पालकांनी आणि शाळांनी या मुलांच्या भाषा-शिक्षणाकडे अधिक जाणतेपणाने लक्ष देऊन मुलांना प्राप्त परिस्थितीचा शक्य तेवढा जास्त लाभ करवून द्यावा, असे फार तर येथे सुचविता येईल.

दुसरा पर्याय, गुंतागुंतीचा नि कठीण असला तरी अशक्य मात्र नाही. भावी पिढीच्या बहुभाषा-शिक्षणाचे माझे प्रतिमान असे आहे :

आज आपल्या मुलांनी केवळ एकाच परिसरभाषेवर ('मातृभाषा' हा शब्द डावलून त्याऐवजी मी 'परिसर-भाषा' असा शब्दप्रयोग करीत आहे !) अवलंबून राहणे, कदाचित त्यांच्या भावी आयुष्याच्या दृष्टीने हिताचे ठरणार नाही. आपल्या मुलांनी परिसरभाषा म्हणून मराठी, राष्ट्रभाषा म्हणून हिंदी आणि परराष्ट्र-संपर्क भाषा म्हणून इंग्रजी अशा तिन्ही भाषा आत्मसात करणे, हे त्यांना आत्मसन्मानाचे आणि व्यावहारिक उपयोगाचे ठरणार आहे. आणि आता आपले गृहित असे आहे की, या तिन्ही भाषा लहान वयात आत्मसात करणे त्यांना शक्य होणार नाही. अर्थातच मुले या तिन्ही भाषांच्या प्रभावी वातावरणात विहरतील तरच त्यांना या तिन्ही भाषा आत्मसात होणार आहेत. म्हणजे, आता आपल्यापुढचा प्रश्न असा आहे, की मुलांच्या अवतीभवती अशी त्रैभाषिक वातावरणनिर्मिती कशी करावी ?

पुन्हा एकदा, मूल भाषा कशी शिकते याविषयीच्या माहितीच्या मूलस्रोताकडे गेलो तर याही प्रश्नाचे उत्तर शोधणे फारसे अवघड जाणार नाही.

मुलांच्या दहा वर्षांपर्यंतच्या वयाचे दोन टप्पे कल्पिता येतील. पहिला टप्पा सहा वर्षांपर्यंतचा आणि दुसरा सहापासून दहा वर्षांपर्यंतचा.या दोनही टप्प्यांचा पुरेपूर फायदा घ्यायचा असेल तर मुलांना घरी, शाळांमधून आणि आजूबाजूच्या परिसरात या तीनही भाषा भरपूर प्रमाणात ऐकायला मिळाल्या पाहिजेत, पाहायला मिळाल्या पाहिजेत आणि बोलून पाहायला मिळाल्या पाहिजेत. मुलांची भाषा विभागणीची क्षमता अशी असते की या तीनही भाषा स्वतंत्रपणे ती बोलू शकतील. आज आपल्या घरांमधून किंवा शाळांमधून किंवा अर्थातच परिसरात या भाषा स्वतंत्रपणे, प्रभावी रीतीने





अनुक्रमणिका

ऐकण्याची सोय नसल्यामुळे या तिन्ही भाषांची मिश्रित अशी एक गल्लतभाषा आपण मुलांकडून ऐकत असतो. ही गल्लत भाषा हा, कोणतीही भाषा प्रभावीपणे शिकण्याच्या मार्गातील फार मोठा अडथळा ठरत असतो. मात्र, अलीकडे उपलब्ध असलेल्या तंत्रज्ञानाचा वापर करून या अडथळ्यावर सहजपणे मात करता येईल, असे मला वाटते. भाषा आत्मसात करण्याच्या विविध टप्प्यांना सुसंगत अशा ऑडिओ-व्हिडिओ टेप्स किंवा सीडीज् निर्माण करता येतील. एक प्रकल्प म्हणून हे काम हाती घेता येईल. याबाबतीत वयोमानानुसार आशयांकित असा विकासपथ ठरविण्याचे काम हे खास अनुभवातज्ज्ञतेचे असणार आहे.

मुलांच्या सहा वर्षांपर्यंतच्या वयात लिहिणे-वाचणे या भाषाशिक्षणाच्या साधनांना काहीच स्थान नसेल. परंतु त्यानंतरच्या वयात ही साधने सुद्धा उपलब्ध होऊन भाषाशिक्षण कितीतरी प्रभावी करता येईल. मुलांना ऐकण्याच्या संधींबरोबरच बोलण्याच्या मुबलक संधी मिळणे ही भाषाशिक्षणाची प्राथमिक अट मानता येईल. बोलण्यानेच केवळ अन्य भाषा शिकण्याबाबतची भीड चेपली जाते, आणि लहान वयात हे सहजपणाने घडून येते. भाषाशिक्षणविषयक 'बाह्य' दृष्टिकोणात, भाषा शाळांमधून 'शिकविण्या'चा विचार जेव्हा आपण करत असतो तेव्हा, नकळतपणे किंवा सवयीनेच आपण लिहिण्या-वाचण्याचाच फक्त विचार समोर ठेवतो. वास्तविक पाहता, मुळात काही प्रमाणात भाषा शिकल्यानंतरच, लिहिण्या-वाचण्याच्या कौशल्यांचा उपयोग करून आपण आपले भाषाशिक्षण अधिक संपन्न करू शकतो. परंतु लहान वयात भाषा शिकण्याचे सारे काम लिहिण्या-वाचण्याशी नव्हे तर ऐकण्या-बोलण्याशी निगडित करायला हवे. ऐकण्या-बोलण्याच्या दमदार संधी मिळणे हाच खरा लहान वयातील भाषा-शिक्षणाचा प्रभावी मार्ग आहे. लिहिण्या-वाचण्याचे कौशल्य अंगी बाणले की मनुष्य ज्ञानार्जनाच्या बाबतीत स्वतंत्र होतो, स्वावलंबी होतो. लिहिण्या-वाचण्याची क्षमता ही मानवी संस्कृतीने माणसाला दिलेली सर्वांत मोठी देणगी आहे; ती योग्य वयात आणि योग्य पद्धतीनेच मिळणे मात्र आवश्यक आहे.

स्वयंशिक्षण हे नेहमीच अनुभवाधारित शिक्षण असते. भाषेचा अनुभव घेऊनच भाषा शिकली जाते. लहान मुले जन्मल्यापासूनच आपापल्या परीने जगाची ओळख करून घेत असतात. त्यांच्या आजूबाजूला असलेल्या परिसरभाषेचा अनुभव त्यांना त्यांच्याही नकळत येतच राहतो. विशेषतः कुटुंबातील इतरांचे, त्यातही प्रामुख्याने आईचे बोलणे त्यांच्या सतत कानी पडत असते; इतरांची बोलताना होणारी ओठांची हालचाल दिसत असते. हळूहळू मुलांना अनुकरणाची ऊर्मी येते. मूल आपणहून ओठांची हालचाल करू लागते, कानावर पडलेले ध्वनी उच्चारू लागते. प्रत्येक वस्तूला,







प्रत्येक नात्याला, प्रत्येक व्यक्तीला नावे असतात हेही पुढे त्याच्या लक्षात येऊ लागते. प्रौढांनी बालकाशी साधलेल्या संवादातून बालक भाषा आत्मसात करण्याच्या दिशेने पावले टाकू लागते. पुढे तर शब्द उच्चारण्याचे नि शब्द आणि वस्तू – व्यक्ती यांचे नाते मनात जोडून पाहण्याचे त्याला वेडच लागते. कालांतराने निरर्थक शब्दांचे रूपांतर अर्थपूर्ण शब्दांत आणि शब्दांचे रूपांतर अर्थपूर्ण वाक्यांत होऊ लागते. मुलांना भाषा येऊ लागलेली असते.

या सर्व प्रक्रियेत, मुलांना भाषिक अनुभव मोठ्या प्रमाणावर मिळण्याची गरज असते. भाषा ही गुंतागुंतीची गोष्ट आहे. शब्द, शब्दार्थ, व्याकरण, वाक्यमालिका या साऱ्या गोष्टी किती कठीण असतात हे, आपण मोठेपणी जेव्हा परकी भाषा शिकू पाहतो तेव्हा चांगले लक्षात येते. पण, मुले हे सारे अडचणींचे डोंगर अगदी सहजपणे पार करतात, वेगाने पार करतात. परंतु ही केवळ अंतर्गत प्रक्रिया नसते. तिला बाह्य अन्य व्यक्तींच्या साहाय्याची जोड लागते. मुलाला घेता येतील असे भाषिक अनुभव प्राप्त करून देण्याची जबाबदारी संबंधित प्रौढांची असते. ज्या मुलांना असे पुरेसे अनुभव मिळत नाहीत त्यांना अडचणींचे डोंगर पार करायला वेळ लागतो. परंतु ज्यांना असे भाषिक अनुभव भरगच्च मिळतात ती मुले आपले भाषा शिक्षण वेगाने करतात, त्यांचा शब्दसंग्रह मोठा होतो आणि त्यांचा केवळ भाषिकच नव्हे; तर एकूणच बौद्धिक विकासही वेगाने साध्य होतो.

स्टिव्हन पिंकर ('हाऊ द माइंड वर्क्स' – १९९७) यांनी असे दाखवून दिले की, जनुकांमधून मिळालेल्या माहितीच्या आधारावर बालकाच्या वाढीबरोबर त्याचा डावा मेंदू विकसित होऊन माणसाचा भाषिक विकास घडून येतो. भाषा समजण्यासाठी वर्निक क्षेत्र आणि भाषा बोलण्यासाठी ब्रोका क्षेत्र ही दोन्ही क्षेत्रे मिळणाऱ्या भाषिक अनुभवांकरवी विकसित होण्याची व्यवस्था जनुकांनी करून ठेवलेली असते. त्यामुळे, ज्यांचा कुठल्याच भाषिक अनुभवांशी काडीचाही संबंध येत नाही, मूल माणसाच्या समूहातच नसेल, समजा, एकटे जंगलात वाढत असेल तर त्याची डाव्या मेंदूतील भाषिक केंद्रांची वाढच होणार नाही. दहा वर्षांपर्यंत असे मानवी संपर्कहीन वाढलेले मूल वयात आल्यानंतरच्या काळात मानवी समूहात येऊन राहिले तरी त्याला भाषा शिकणे जमणार नाही. ज्या मुलांना मानवी समूहात राहून सुद्धा कोणत्याही सामाजिक कारणांमुळे पुरेशा भाषिक अनुभवांना वंचित राहावे लागते, अशी मुले आपल्या डाव्या मेंदूमधील भाषिक केंद्रांचा पुरेसा विकास साधू शकत नाहीत; नि मग त्यांचे भाषाशिक्षण कमजोरच राहते. मात्र ज्या मुलांना जाणीवपूर्वक भरपूर भाषिक अनुभव दिले जातात अशी मुले वेगाने भाषाप्रभू होतात. भाषासंपन्न होतात. भाषेकरवी

जीवनसंपन्न करण्याची किल्ली त्यांना गवसलेली असते.

या विवेचनाचा व्यावहारिक अर्थ असा की, सामान्यतः दहा वर्षांपर्यंतच्या वयात मुलांना, भाषा ऐकण्याचे, बोलण्याचे, पाहण्याचे, हाताळण्याचे, समजण्याचे, अर्थ लावण्याचे, कल्पना करण्याचे, विचार करण्याचे, भाषिक सौंदर्य न्याहाळण्याचे, शब्दांच्या विविध सामर्थ्यांचे, तालाचे, लयीचे, विनोदांचे असे विविधांगी अनुभव प्राप्त करून दिले गेले पाहिजेत. शाळेतील एका क्रमिक पुस्तकाने साध्य होणारी ही गोष्ट नाही. त्यासाठी जाणीवपूर्वक तयार केलेला एकसंध, एकात्मिक आणि विकासात्मक असा संपूर्ण 'कार्यक्रम' आखला जाण्याची गरज आहे. भाषेचे शिक्षण वर्गातील तासिकांपुरते आणि त्यासाठी नेमलेल्या क्रमिक पुस्तकांपुरते मर्यादित न करता ते व्यापक समाजजीवनाशी विविध धाग्यांनी जोडले गेले पाहिजे. मेंदूमधील भाषाक्षेत्रांच्या वयोचित विकासासाठी आणि व्यवहारात भाषा समृद्ध करण्यासाठी भाषिक निविष्टींची (इनपुट्स) मालिका ही प्रत्यक्ष जीवनव्यवहारातूनच घ्यायला हवी. जीवनाचे शक्य तेवढे धागे-दोरे आणि कंगोरे अशाप्रकारच्या भाषिक जीवनानुभवांतून मुलांना प्राप्त होतील असे पाहिले पाहिजे.

भाषाशिक्षणाचा असा कार्यक्रम आखताना, पुढील बाबी ध्यानात ठेवल्या पाहिजेत :

(१) प्रामुख्याने दहाव्या वर्षापर्यंतच्या वयासाठी हा कार्यक्रम आखला पाहिजे.
(२) हा कार्यक्रम सर्वसमावेशक असला पाहिजे. म्हणजे परिसरातील साऱ्या जीवनानुभवांशी त्याची नाळ जोडली पाहिजे.
(३) या कार्यक्रमाला मेंदूआधारित विकासाशी जोडले पाहिजे; त्याआधारे भाषा-शिक्षणाचा विकासपथ आखला पाहिजे.
(४) कार्यक्रमांतर्गत उपक्रम असे असले पाहिजेत की ते मेंदूमधील सर्व भाषिक क्षेत्रांचा वापर करवून घेतील.
(५) मेंदूमधील सर्व भाषिक क्षेत्रांच्या विकासाला चालनाही देतील असे हे उपक्रम असले पाहिजेत. 'जुळणीचा सिद्धांत' (थिअरी ऑफ कनेक्शनिझम) हा याचा पाया असेल.
(६) प्रत्यक्षपणे भाषिक अनुभवांची आखणी हा या कार्यक्रमाचा गाभा असला पाहिजे. किंबहुना भाषाविकासाचे हे संपूर्ण प्रतिमानच 'अनुभवाधारित भाषा विकास' अशा स्वरूपाचे असेल.
(७) भाषेच्या सर्व क्षमता आणि कौशल्ये यांचा विकास साधणारा असा हा कार्यक्रम असेल.

(८) भाषा ही विशिष्ट सांस्कृतिक परिसरातून आत्मसात केली जात असल्यामुळे त्याच्या पार्श्वभूमीवरच हा कार्यक्रम आखला जाईल.

(९) लहान वयात एकापेक्षा अधिक भाषा शिकण्याची असलेली क्षमता विचारात घेऊन, (आपल्यापुरते बोलायचे तर) मराठी परिसरभाषा, हिंदी ही राष्ट्रीय संपर्कभाषा आणि इंग्रजी ही आंतरराष्ट्रीय संपर्कभाषा म्हणून या तीनही भाषा एकाचवेळी आत्मसात होतील अशी वातावरण-निर्मिती हा या कार्यक्रमाचा अविभाज्य भाग राहील.

(१०) अत्याधुनिक तंत्रांचा विवेकपूर्ण वापरही करावा लागेल.

भाषा हा मानवी जीवनातील एक महान शोध आहे. भाषेमुळे संवाद शक्य झाला. संवादामुळे माणसा-माणसांमधील संबंध जवळिकेचे झाले नि वृद्धिंगत झाले. भाषेमुळे जीवनाला वेग आला, शास्त्रांची नि तंत्रांची प्रगती शक्य झाली. आता आजच्या युगात भाषेशिवाय जीवनाची आपण कल्पनाही करू शकत नाही. कारण आज भाषा हे केवळ मनुष्यमात्रांमधील संवादाचे साधन राहिलेले नाही तर ते व्यक्तिगत पातळीवर बौद्धिक बाबी नि विविध विषय शिकण्याचे, अनेक कौशल्ये आत्मसात करण्याचे साधन झाले आहे. ते जसे विचार करण्याचे साधन आहे तसेच ते विचार ग्रहण करण्याचेही साधन आहे. भाषा हे एकाच वेळी कल्पना करण्याचे नि दुसऱ्यांच्या कल्पना आत्मसात करण्याचे साधन आहे. ते निखालसपणे अभिव्यक्तीचे, कलानिर्मितीचे आणि त्याचवेळी अभिव्यक्तींचा आस्वाद घेण्याचे साधन आहे. एखाद्याच्या भाषेकरवी आपल्याला त्याची चांगली ओळख होऊ शकते. व्यक्तीचे सौम्यपण, विनयशीलता किंवा आक्रमकता त्याच्या भाषेकरवी प्रत्ययाला येते. व्यक्तीचे केवळ भौगोलिक स्थानच नव्हे; तर तिचे सामाजिक स्थानही भाषेकरवी जाणून घेता येते. इतिहासाच्या गतकालाच्या नोंदी, वर्तमानाचे विवेचन आणि भविष्याचे अंदाज घेण्याचे व त्याकरिता नियोजन करण्याचे ते प्रभावी साधन आहे. त्यामुळे भाषेशिवाय मनुष्य असणार नाही, आणि प्रगल्भ, संपन्न भाषेशिवाय सुसंस्कृत मनुष्य असणार नाही.

असा सुसंस्कृत मनुष्य घडवणे हेच भाषेचे महान कार्य ठरणार आहे ! ■

एच-२०, पिनाक मेमरीज, फेज २, कोथरूड, पुणे 38. दूरध्वनी : 25459387

**महत्त्वाची सूचना :**

'भाषा आणि जीवन'च्या वार्षिक वर्गणीदारांनी नव्या वर्षाची वर्गणी पाठवावी. वर्गणीचे तपशील आवरणपृष्ठ 'तीन'वर आहेत.

# आरे भाषा निघंटुबु : एक परिचय

माणिक धनपलवार

भारतातील राज्यभाषांमध्ये मराठीचे एक विशिष्ट स्थान आहे. तिच्या शाखोपशाखा कमीअधिक प्रमाणात भारतभर विस्तारलेल्या आहेत. गतेतिहासात मराठ्यांच्या काळात व पुढे पेशवाईत मराठे चारही दिशांना पोचले व आपल्या सामर्थ्याचा व संस्कृतीचा प्रभाव त्यांनी त्या त्या ठिकाणी उमटवला. उत्तर भारतातील अनेक मराठी संस्थाने याची साक्ष देतील. दक्षिणेकडे कर्नाटकात तसेच तमिळनाडूत तंजावर व मदुरैपर्यंत ते पोचले. राजकाजाच्या परिघाबाहेरही मराठी लोकांनी दक्षिणेकडे स्थलांतरे केली. यापैकी आंध्रच्या तेलंगण विभागात त्यांनी वस्ती करून तेथील शेतीव्यवसायाला चालना दिली, व स्वत:ची मराठी बोलीही जपली. त्यांची स्वत:ची एक बोली आहे व त्यातून त्यांचा व्यवहार चालतो, याची कल्पना प्राय: कुणाही मराठी अभ्यासकाला नव्हती. अशा स्थितीत डॉ. श्री.रं. कुलकर्णी (भूतपूर्व मराठी विभागप्रमुख, उस्मानिया विद्यापीठ) यांनी सेवानिवृत्तीच्या काळात जे अनेक महत्त्वाचे उपक्रम हाती घेतले, त्यात या बोलीचा त्यांनी केलेला अभ्यास व संशोधन यांचा अग्रक्रमाने उल्लेख करावा लागेल. या बोलीच्या पाहणीसाठी त्यांनी वरंगल व त्या परिसरातील अनेक वस्त्या, वाड्या व खेडी यांना भेटी दिल्या. कधी बसने, कधी दुचाकीवर तर कधी पायी भ्रमण करून त्यांनी इतस्तत: विखुरलेल्या मराठी लोकांच्या जीवनपद्धतीचे जवळून निरीक्षण केले व त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण बोलीचे अनेक नमुने ध्वनिमुद्रित केले. या सर्व परिश्रमाचे फलित म्हणजे त्यांनी सिद्ध केलेला 'अरे मराठी समाज : भाषा व संस्कृती' हा महत्त्वपूर्ण ग्रंथ होय.

द्रविडभाषा कुलातील तेलुगूच्या सान्निध्यात वर्षानुवर्षे राहिलेल्या मराठी भाषकांच्या बोलीची वैशिष्ट्ये समजावून घेण्यासाठी त्यांनी जमविलेली सामग्री अत्यंत मोलाची ठरणारी आहे. ही भाषा व त्याविषयी डॉ. कुलकर्णी यांनी मांडलेले अभ्यासपूर्ण विचार यांचे मंथन होणे आवश्यक आहे. त्यातून मराठी भाषेच्या अभ्यासाची दक्षिणेकडील गवाक्षे उघडी होण्यास मदत होईल व तंजावरी व तत्सम बोलींचे स्वरूप समजावून घेण्यास ते निश्चितच साहाय्यभूत ठरेल. या ग्रंथास लेखकाने आरे बोलीच्या

शब्दकोशीचीही जोड दिली आहे.

आंध्रप्रदेशाच्या तेलंगण विभागात स्थित मराठी भाषकांच्या बोलीचा एक कोश 'आरे भाषा निघंटुवु' या शीर्षकाने इ.स.१९९५मध्ये प्रकाशित झाला. याचे संपादक पेर्वारम् जगन्नाथम् हे स्वत: आरे भाषक आहेत. ते वरंगल येथील काकतीय विद्यापीठात तेलुगूचे प्राध्यापक होते. त्यांचा पीएच.डी.चा प्रबंधही या बोलीवरच आधारित आहे. या कोशाचे सहसंपादक डॉ. रव्वा श्रीहरि हे केंद्रीय विद्यापीठ, हैदराबाद येथे तेलुगुचे प्राध्यापक होते. या उभयतांनी हा कोश अकरा वर्षांपूर्वीच प्रसिद्ध केलेला असला तरी तो मराठीच्या अभ्यासकांना फारसा ज्ञात नाही. याचे कारणही उघड आहे. ही बोलीच मुळी जवळपास वीस वर्षांपूर्वी प्रकाशात आली. या बोलीचे क्षेत्र व्यापक नाही. बोली बोलणाऱ्या लोकांची संख्याही काही हजारांच्या आसपास. हा कोश मराठी बोलीवर आधारित असला तरी तो मराठीत नाही. यामुळे तो तसा वाचकांपुढे आला नाही.

ज्यांच्या बोलीवर हा कोश रचलेला आरे, त्या आरे लोकांची वस्ती तेलंगणातील वरंगल, निझामाबाद, आदिलाबाद व करीमनगर या चार जिल्ह्यांतील काही भागांत गटागटांनी विखुरलेली आहे. यापैकी वरंगल वगळता बाकीचे तीन जिल्हे महाराष्ट्राला लागून आहेत. वरंगल जिल्ह्यात यांची बऱ्यापैकी वस्ती आहे. कांचनपल्ली, रामवरम् पीसरा, मंचलगिरी ही गावे यादृष्टीने महत्त्वाची होत.

'आरे' हा शब्द संस्कृत 'आर्य'पासून निष्पन्न झाला असून दक्षिणेत मराठी भाषक 'आरे' लोक म्हणून कैक शतकांपासून ओळखले जातात. तेलुगु व कन्नड भाषेतील सर्व कोशांत इकडील मराठी भाषकांना 'आरे' म्हणूनच संबोधलेले दिसून येते. डॉ. श्री.रं. कुलकर्णी यांनी योजिलेला 'अरे' हा शब्द कुठेही प्रचारात नाही.

हा कोश खूप लहान म्हणजे रॉयल आकाराच्या चाळीस पृष्ठांचा आहे. कमीअधिक तीनशे वर्षांपासून या भागात वास्तव्य करणाऱ्या लोकांच्या बोलीचा हा कोश होय. डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी तामिळनाडूतील तंजावरी बोलीवर आधारलेल्या 'मराठी भाषेचा तंजावरी कोश' संपादून प्रकाशित केला. याप्रमाणे हे दोन्ही कोश द्राविड भाषांच्या सहवासात वाढलेल्या मराठीवर आधारित आहेत. यामुळे दोन्ही बोलींत काही ठिकाणी तुलनाही संभवते. दोन्ही प्रदेशांतील वस्ती जवळपास एकाच काळातील आहे, हेही लक्षात घेण्यासारखे आहे.

कृषीव्यवसाय करणारे आरे लोक खेड्यांतून, छोट्या छोट्या वाड्यांतून वस्ती करणारे आहेत. शहरी जीवनाशी त्यांचा संपर्क कमी. परवा परवापर्यंत साक्षरतेचे प्रमाण नगण्यच होते. शेतीव्यवसाय, धार्मिक विधी, विवाहादि संस्कार तसेच कौटुंबिक नातेसंबंध यापुरताच त्यांचा भाषिक व्यवहार मर्यादित. यामुळे शब्दसंभारही










तेवढ्यापुरताच. राजकीय, सांस्कृतिक क्षेत्रांशी त्यांचा दूरान्वयानेच संबंध. (गेल्या पाच-पन्नास वर्षांत ही परिस्थिती बदलली आहे.) यामुळे मराठीचा वापर स्थानिक व कौटुंबिक पातळीवरच असे. बाहेरील सर्व व्यवहार तेलुगुतून होतो. परिणामत: भाषेचा विकास व्हावयास वावच नव्हता. भाषेची समृद्धी त्या त्या भाषकांच्या गरजेवर अवलंबून असते. गरजा परिमित म्हणून भाषेचा आवाकाही सीमित. या कोशाचा व त्याच्या लघुत्वाचा विचार करताना हे वास्तव लक्षात घ्यावयास हवे.

**कोशाची रचना :** कोशात देवनागरी वर्णमालेच्या अनुक्रमाने शब्द दिले आहेत. प्रथम (१) मराठी शब्द, तेलुगु लिपीत (२) त्याचा उच्चार, रोमन लिपीत (३) त्याचा तेलुगूत अर्थ, तेलुगु लिपीत व शेवटी (४) त्याचा अर्थ इंग्रजीत, रोमन लिपीत. उदा० अर्सी (तेलुगू लिपीत), अर्सी (रोमन लिपीत), अद्दम (तेलुगुत अर्थ), मिरर (इंग्रजीत अर्थ)

**आरे मराठीचे व्याकरणिक विशेष :** प्रमाण मराठीतील शब्दरूपात तेलुगूच्या प्रभावाने विविध बदल झालेले दृष्टीस पडतात. प्रथम दृष्टोत्पत्तीस येणारा महत्त्वाचा बदल म्हणजे शब्दांना मिळालेले 'उ'कारान्त रूप. 'उ'कारबाहुल्य हा तेलुगूचा महत्त्वाचा विशेष असून त्याचा प्रभाव मराठीवर पडणे स्वाभाविक आहे. नाम, विशेषण, क्रियापद, क्रियाविशेषण आदि शब्दांच्या शेवटी 'उ'कार येतो. उदा० अंगनु (आंगण), कागूदु (कागद), झाडु (झाड), ईसु (वीस), चंगलु (चांगला), सोंबरु (समोर), वोगचु (उगीच).

महाराष्ट्रात शिवकालीन मराठीत 'उ'कार होता, असे कृ.पां.कुलकर्णी म्हणतात (१९५०, २७३) तशी त्यांनी यासंबंधातली उदाहरणेही दिली आहेत. राजकाजाच्या योगे महाराष्ट्राचा दक्षिणेशी संपर्क आल्यामुळे काही तुरळक ठिकाणी कागदपत्रांतून 'उ'कार येत असला तरी तो अत्यंत अपवादात्मक असून त्याचे स्वरूप सार्वत्रिक नाही. आरे मराठीत तर 'उ'काराशिवाय पान हालत नाही. यामुळे आरे मराठीतील 'उ'कार यादवकालीन किंवा शिवकालीन भाषेचे अवशिष्ट रूप नव्हे, तर तो तेलुगूचा प्रभाव होय, हे स्पष्ट आहे. पुढे पेशवाईत 'उ'कार गेला हेही कृ.पां.कुलकर्णी नंतर निदर्शनास आणतात. या वैशिष्ट्यासोबत नामांतर्गत किंवा नामाच्या अंती 'अ' या स्वराचे 'इ'त परिवर्तन झालेले दिसेल.

उदा० वोसिरि (ओसरी), दुरिडि (दुरडी), पितिलि (पितळी=ताट). हा विशेष तेलुगु भाषेतही दिसून येतो. तेलुगूतील विद्वान अभ्यासक जी. सीतापती यांच्या 'हिस्ट्री ऑफ तेलुगु लिटरेचर' या सहित्य अकादमीने प्रसिद्ध केलेल्या ग्रंथात यासंबंधीची उदाहरणे आली आहेत (पृ. ८६). तंजावर येथे सिद्ध झालेल्या 'राज्यव्यवहारकोशा'त









तसेच तंजावरच्याच 'भाषाप्रकाश' या कोशातही अशी उदाहरणे आली आहेत (माणिक धनपलवार, १९९७, पृ. २७९).

च > स - दन्तमूलीय 'च' चा 'स' करण्याची प्रवृत्ती तेलुगूच्या निम्नस्तरीय वा ग्रामीण लोकांच्या भाषेत आढळते. उदा० चापा > सापा. 'चापा' म्हणजे चटई. या प्रवृत्तीचा आरे भाषेवर प्रभाव पडला आहे. 'ठेंचा' याचे 'तेन्सा' असे रूप होते. तसेच उंबराचं > उंबरासं, किल्लीच्या > किल्लीसा, तापत्याचं > तापत्यासं (तापना हे एक प्रकारचे रेशमी कापड होय.) याच पद्धतीने दन्तमूलीय 'ज' चा 'स' होताना दिसतो पण तो प्राय: षष्ठी तत्पुरुषाच्या सामासिक शब्दात. उदा० मासपट्ट (माजपट्टा). माजपट्टा म्हणजे कंबरपट्टा. स्वतंत्रपणे आलेला 'माज' हा 'माज'च राहतो. त्यात बदल होत नाही. तंजावरच्या मराठी बोलीतही 'ज'चे 'स'मध्ये असेच परिवर्तन होते. उदा० आवाज > आवास, पांचू > पांसू (माणिक धनपलवार, १९९७, १८३).

श > स - तेलुगूत मूलत: श, ष हे उच्चार नाहीत. त्यांच्या 'मूळाक्षरां'तही हे वर्ण नव्हते. पण संस्कृतच्या प्रभावाने हे वर्ण व उच्चार तेलुगूत आले. हे उच्चार नसलेले काही तेलुगु ग्रंथही पूर्वी निर्माण झाले. आरे मराठीत 'श' वर्ज्य नसला तरी तो भाषेत कमी प्रमाणात येतो. प्रमाण मराठीतील 'श'चा 'स' करण्याचीच विशेष प्रवृत्ती आहे.

उदा० सिंदि (शिंदी), सिंपि (शिंपी), सिदोरी (शिदोरी), सेंडा (शेंडा), सिंपडने (शिंपडणे).

ळ > ल - प्रमाण तेलुगूत 'ळ' हा उच्चार असला तरी ग्रामीण व जनसामान्याच्या तेलुगूत 'ळ'च्या जागी 'ल' येतो. महाराष्ट्रात मात्र 'ळ'चा उच्चार मराठी भाषकांच्या सर्व थरांतून होतो. प्रमाण मराठीतील 'ळ'चे आरे मराठीत 'ल'मध्ये रूपांतर होते. उदा० कुल (कूळ), होलु, (होळ), वालुक (वाळुक), वोलंबा (वोळंबा), हातालनं (हाताळणे)

व > ओ - 'व'चा 'ओ' करण्याची एक वेगळी प्रवृत्ती आरे बोलीत आहे.

उदा० ओरनु (वरण), ओराडु (वऱ्हाड), वोस्तु (वस्तु), वोरे (वर). या व्यतिरिक्त अल्पप्राणाचा महाप्राण होणे व महाप्राण वर्णाचा अल्पप्राण होणे तसेच आद्य 'वी' ची 'ई' होणे (वीज > ईज, विसरणे > इसरणे ) या ग्रामीण मराठीच्या प्रवृत्ती येथेही आढळून येतात. यामुळे त्यांचा सविस्तर विचार येथे केला नाही.

उच्चारलोप : उच्चारसौकर्यासाठी कधी शब्दातील मध्य वर्णाचा, तर कधी अंत्य वर्णाचा लोप होतो. कधी लोप होताना अन्त्य वर्णाचे द्वित्त होते, तर कधी अंत्य वर्णाचा लोप होऊन त्याचा स्वर मागील वर्णाला लागतो. उदा० भरडणे > भरने, संवय > सवं, सेंदणें > सेन्नें, उजवा > उजा, तसेच सोन टाकणे (सोडून टाकणें)

पान टाकणे (फाडून टाकणे) मान टाकणे (मारून टाकणें) असे वाक्प्रयोगही होतात. हा विशेष तंजावरी मराठीतही आढळून येतो. (धनपलवार १९८६, १८४)

अर्थांतर : परभाषिक प्रांतातील दीर्घ वास्तव्यामुळे स्वभाषेतील शब्दांच्या अर्थात बदल होतो. भाषा तीच असली तरी नवनव्या पिढ्या येतात व नंतरच्या समाजघटकांना पूर्वीच्या शब्दसंकेतांचे समुचित ज्ञापन होतेच असे नाही. यामुळे शब्दाच्या अर्थात बदल होतो. पुढील उदाहरणांवरून त्याची कल्पना येईल.

पांसरी : हे जुने वजनाचे परिमाण. वजनात दशमानपद्धती येण्याच्या किती तरी वर्षे अगोदर हे वजन-माण मराठवाड्यातील खेडोपाडी प्रसारात होते. पण या शब्दाला आरे बोलीत 'तराजू' हा अर्थ प्राप्त झाला आहे.

मोहालु (मोहोळ) म्हणजे मधाचे पोळे, पण येथे त्यास 'मध' हा अर्थ लाभला आहे.

हडकने (हडकणे) -मराठवाड्यात अद्यापही वापरात येणारा शब्द. याचा अर्थ सुकणे, वाळणे. कपडे वाळण्याच्या संदर्भात हा शब्द येतो. पण तो 'विझणे' या अर्थानें आरे लोक उपयोजितात.

तुटका - ही शिवी मराठवाड्यात, विशेषकरून नांदेड जिल्ह्यात रूढ आहे. याचा अर्थ किंमत नसलेला, कवडीमोलाचा माणूस. पण यास दांडगाई करणारा, दुराग्रही हा अर्थ लाभला आहे.

सीदा (शिधा) : हा ब्राह्मणास दिला जातो; पण हा शब्द 'मजुरी' या अर्थाने योजिला जातो.

मातने (मातणे) : याचा अर्थ माजणे. पण आरे बोलीत तो 'लठ्ठ' या अर्थाने येतो.

मराठवाड्यातील काही शब्द : आरे लोक सीमेलगतच्या मराठवाड्यातून (व विदर्भातून) येऊन तेलंगणात राहू लागले. त्यामुळे त्यांच्या बोलीत मराठवाडी भोषेचे काही विशेष दिसतात. येथे तसे काही शब्द पाहू. कंसात आवश्यक तेथे मराठवाड्यात प्रचलित असलेली शब्दरूपे दिली आहेत.

तिकोनु (तिकोनी) : लोणच्याचा रस्सा. वरलाकडं : पश्चिमेकडे, खाल्लाकडं = पूर्वेस, गंगंकडं = उत्तरेकडे. (यापैकी काही शब्द महाराष्ट्रातील अन्य भागांतही रूढ असू शकतील.)

हलगटु (हलगट) : रेडा. नक्करा (नक्कर) : अल्प, फार थोडे. चोकटु (चकोट) : मूळरूप 'चोखट' म्हणजे चांगले. जतनु (जतन) : सांभाळून असणे, सावध असणे. (प्रवासाला जाताना या शब्दाचा विशेष वापर होतो.)

मावळन (मावळण) : मामी, मामाची पत्नी. साळवन (साळवण) : साळीचे शेत.

**मध्ययुगीन मराठीतील काही शब्द** - कुठल्याही बोलीत प्राचीन शब्द अवशिष्टरूपाने अस्तित्वात असतात. कारण भाषेप्रमाणे बोलीत परिवर्तनाला वाव नसतो. एखादा भाषिक समूह जे शब्द स्वत:बरोबर एकदा घेऊन जातो, ते त्यांच्या भाषेला चिकटून असतात. आरे बोलीतही असे काही शब्द आढळून येतात.

दारवंटि (दारवंटी) = उंबरठा. 'महाराष्ट्र शब्दकोशा'त याचे रूप 'दारवंड' असे दिले आहे, तर 'मराठी भाषेचा तंजावरी कोश' यात 'दारवंटा' असे रूप आले आहे. तिन्ही रूपांत फारसा फरक नाही.

चेटका = मातीचे भांडे, पहा ''चिटकी, मोरवा, पातली,'' दासोपंत (वि.ल. भावे, पृ. ३००). उतुते = खारीक, तंजावरी बोलीतही हा शब्द येतो.

पातेजने (पातेजणे) : विश्वास ठेवणे. पहा ''कसा पातेजूं सांग तुझ्या कामीं'' (अ.का. प्रियोळकर, पृ.१६). परवडी = आवड. अल्लाडु, ऐराडु = अलीकडे. पैराडु = पलीकडचा

**उच्चारविशेष** : मध्ययुगीन काळातील काही उच्चारविशेषही आरे मराठीने जपून ठेवले आहेत. उदा० घांटु (गांठ), केंस, पांखरूं इत्यादी. शब्दाच्या पहिल्या वर्णावरील अनुस्वाराचा उच्चार सानुनासिक होतो. सध्या मराठीत त्यावरील अनुस्वाराचा उच्चार होत नसल्यामुळे नव्या शुद्धलेखनानुसार त्यास फाटा मिळाला आहे.

**तेलुगु शब्दांचा अंतर्भाव** : हूटु (=वारूळ), मुडसास : (=श्रावण महिन्यात विवाहित कन्येची करावयाची बोळवण), नानु (=गळ्यातील सोन्याचा दागिना), मेरिगे (=साळीचा दाणा), कुंटेकारु (=मेंढपाळ), पंटा (=बाजेचा सुंभ), उग्गु (=घामरीच्या गळ्याला बांधलेला दोर), कन्न (फळ लागणे) - या शेवटच्या शब्दाची उत्पत्ती तेलुगूपासून लागावी. तेलुगूत कन्नतल्लि (म्हणजे जन्मदात्री आई) हा शब्द रूढ आहे. यातील 'कन्न'चा 'फळ लागणे' याशी संबंध जुळू शकतो. कोशकर्त्यांनी मात्र यात आलेल्या तेलुगु शब्दांविषयी काहीही सांगितलेले नाही.

**काही अपरिचित शब्द** : मराठीला ज्ञात नसलेले काही शब्द आरे मराठीत आढळून येतात. उदा० कडपडनं = जन्म देणे, खट्टा = पंचा, झिळि = छिद्र, मौरा = लहान भांडे, एलु = पैंजण, परवरि = आंगण, ओलि = चादर, पाडुसं= थंड (पारोसेपासून आला असावा), तेकपा = त्यावेळी, लग्न = स्पर्श करणे, पेरणं = सारवणे, वरलं = लग्नातील पवित्र कलश, पोट शिजनं = द्वेष करणे, दुसऱ्यावर जळणे, जुन्नंभिंतु = जुनी भिंत ही शिवी आहे. घराला कांटे पडो (हीही एक शिवी.) पनन : पाणी तापविण्याचे भांडे (पाणी तापवणे या क्रियेवरून सिद्ध झालेला दिसतो).

काही शब्दसंकेत : कोशात 'चोकुटपाणी' हा शब्द आला आहे. त्याचा अर्थ 'प्यावयाचे पाणी' असा आहे. तो अर्थ भाषिकदृष्ट्या एवढ्यापुरताच मर्यादित असला तरी त्याला एक तेलुगु संकेत चिकटला आहे. तेलुगु भाषिक 'प्यावयास पाणी' द्या असे आणि एवढेच कधीही म्हणणार नाही. तो प्यावयास 'चांगले पाणी' (मंचि नीलु) द्या असेच म्हणेल. या 'मंचि नीलु' चे 'चकोट पाणी' हे भाषांतर आहे. खाऱ्या पाण्यापासून गोडे पाणी वेगळे दाखविण्याचा हा भाग असावा.

घोटु : याचा अर्थ 'शब्द' किंवा भाषा असा आरे कोशात दिला आहे. गोष्ट > घोट > घोटु असा शब्द निष्पत्तीचा क्रम होय. 'गोष्ट' या शब्दाचा असा अर्थ सिद्ध होण्यास तेलुगूचा प्रभाव कारणीभूत आहे. तेलुगूत 'माटा' हा शब्द 'भाषा' यासाठी, तसेच 'तुम्हांला मी आता एक गोष्ट सांगतो' म्हणजे घटना सांगतो, या दोन्ही अर्थी रूढ आहे. त्यामुळे 'गोष्ट' हे 'माटा'चे भाषांतर ठरले, व ते वापरले जाऊ लागले. तंजावरच्या मराठीतही असेच आढळून येते. 'कोर्वा' या तमिळ 'गोष्टी'स (=शब्दास) मराठीत 'सांखळ' म्हणतात, असे नृत्यकलेवरील ग्रंथाच्या प्रस्तावनेत आले आहे. (कृष्णस्वामी महाडिक, पृ. १०)

तंजावरी बोली आणि आरे मराठी : या दोन्ही बोलींची सध्या तरी काही एका मर्यादितच तुलना करता येईल. कारण या दोन्हींचा व्याप्तिपरीघ (संख्या व समाजातील विभिन्न थर या दृष्टीने ) यांत फार अंतर आहे. काही ठिकाणी साम्य आढळून येते तर काही ठिकाणी भेदही स्पष्टपणे प्रतीत होतो. तंजावरी बोलीत आरे मराठीतील शब्दांती 'उ'कार फार कमी ठिकाणी येतो तर तंजावरी बोलीत प्रकर्षाने येणारा 'ळ'कार आरे मराठीत येत नाही 'क्ष' आणि 'ज्ञ' हे उच्चारही आरे मराठीत कुठे दिसत नाहीत. मूर्धन्य 'ण' हा महाराष्ट्रातील ग्रामीण मराठीप्रमाणे यातही येत नाही. दोन्ही बोलीत काही जुने शब्द असले तरी त्यांची रूपे काही ठिकाणी बदलली आहेत. 'वऱ्हाड' हा शब्द 'लग्नां'साठी दोन्ही बोलींत येतो. तंजावरी भाषेत तो 'वराड' या रूपात तर आरे मराठीत त्याचे 'वोराडु' असे रूप होते. 'दादला' (नवरा) हा शब्द दोन्हीतही 'दाह्ला' या रूपातच येतो. ''माझ्या दाह्ल्याचा मुशारा (पगार) अजून आला नाही.'' असे तंजावरची स्त्री सहज म्हणते. हुटु म्हणजे वारूळ. तंजावरी मराठीत ते 'हुत्त' या रूपात येते. चिम्ना (लहान), जांमाई (जांवई), तम्मा (तेव्हा) हे शब्द या दोन्ही भाषांत याच रूपात येतात. केंस, वांसरू यांचे अनुनासिक उच्चार दोन्ही बोलींत समान आहेत. उच्चारसौकर्यासाठी वर्णलोप होण्याची प्रक्रियाही सारखीच आहे.

ग्रामीण बोली : आरे आणि तंजावर : आरे लोक शेतीव्यवसाय करणारे. यामुळे त्यांची भाषा ग्रामीण स्वरूपाची असणे स्वाभाविक आहे. येथे तंजावरच्या संस्कृत









पंडितांची मराठी ग्रामीण सरणीची का असावी असा प्रश्न डॉ. शं.गो. तुळपुळे यांनी उपस्थित केला आहे. 'मराठी भाषेचा तंजावरी कोश' या ग्रंथाच्या प्रस्तावनेत ते लिहितात- ''(कोशकर्ता) बहुश्रुत असला तरी त्याची भाषा कुणबाऊ वाटते. किंबहुना तो अनागरी बोलीचा शब्दकोश रचीत आहे, असेहीक क्वचित वाटते... तसेच शब्दार्थ देतानाही कुणबाऊ भाषेचा अवलंब केला आहे.'' यासंबंधात त्यांनी क्वचित 'लई किंवा लै, अइनुबाइनु, मणताती, मणताहेत'' अशी काही उदाहरणे दिली आहेत. ''भाषेची अपभ्रष्टताही पुष्कळ जाणवते''असेही ते पुढे लिहितात (पृ.२६) तुळपुळ्यांचे हे अवलोकन वस्तुस्थितीस धरूनच आहे. कोशच नाहीतर मराठी काव्याची रचना करताना विद्वान पंडित संस्कृतप्रचुर शब्दरचनेबरोबर- ''लेहो घाली बाप साळे विलासा'' (माणिक धनपलवार, १९८०, २-२६) असा ग्रामीण शब्दयुक्त चरणही सहज लिहून जातात. तंजावरची बोली अपभ्रष्ट शब्दरूपांनी युक्त असली तरी ती त्यांची नित्याची, व्यवहारातील नैसर्गिक भाषा होय. त्या भाषेचा वापर करणे तिकडील कवि-लेखकांना दोषास्पद वाटत नाही. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यातील तंजावरकडील लेखक रामचंद्रराव अर्काटकर यांनी टिपु सुलतानावरील इंग्रजी ग्रंथाच्या अनुवादात आपली भाषेसंबंधीची भूमिका मांडली आहे. ते लिहितात, ''तंजावरी बोलीचा अवलंब करणे - हे क्वचितच चुकीचे मानता येईल. मी जर याव्यतिरिक्त अन्य भाषामाध्यम स्वीकारले असते तर मद्रास प्रांतातील लोकांना ते बरेच अनाकलनीय झाले असते.'' (अर्काटकर, पृ.१) हीच भूमिका तंजावरी कोशकर्त्याचीही असावी.

आरे भाषा व तंजावरची मराठी बोली यांचा तौलनिक अभ्यास होण्याची गरज आहे. येथे फक्त 'निघंटु'च्या संदर्भातच विचार केला आहे. हा आरे कोश अजून विस्तृत व व्यापक स्वरूपात सिद्ध व्हावयास हवा. त्याकरिता वरंगलव्यतिरिक्त उर्वरित प्रदेशातील मराठी बोलीची पाहणी व त्या बोलीचे ध्वनिमुद्रण होणे आवश्यक आहे. डॉ. श्री.रं. कुलकर्णी यांनी आरे मराठीवरील ग्रंथाला एक विस्तृत शब्दसूची जोडलेली आहे. आरे निघंटु, ही शब्दसूची व नवीन शब्दांचा संग्रह यांच्या साहाय्याने आरे मराठीतील शब्दसंख्या निश्चितच वाढू शकेल. मग तंजावरच्या मराठीशी तुलना करण्याचा मार्ग बराच प्रशस्त होईल व प्रारंभी सूचित केल्याप्रमाणे द्राविड-भाषा - प्रभावित बोलीसंबंधाने काही महत्त्वाचे निष्कर्ष निश्चितच हाती लागतील, असे समजण्यास हरकत नाही.

**संदर्भ व आधार :**

अर्काटकर, रामचंद्रराव (अनुवादक), १८५०, 'टिपु सुलतान यांचे पदच्युतीविषयी संक्षेप निरूपण', सी.व्ही. कृष्णाराजू, चन्नापट्टण.

कुलकर्णी, कृ.पां. १९५०, 'मराठी भाषा: उद्गम आणि विकास' मॉडर्न बुकडेपो, पुणे.
कुलकर्णी, श्री.रं, १९८७, 'अरे मराठा समाज : भाषा व संस्कृती', महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई.
गिडुगु, सीतापति, १९६८, 'हिस्ट्री ऑफ तेलुगु लिटरेचर', साहित्य अकादमी, नवी दिल्ली
तुळपुळे, शं.गो. १९६२, 'रामकविकृत भाषाप्रकाश', पुणे विद्यापीठ, पुणे.
तुळपुळे, शं.गो. १९७३, 'मराठी भाषेचा तंजावरी कोश', व्हीनस प्रकाशन, पुणे.
दाते, य.रा. १९३५, 'महाराष्ट्र शब्दकोश' खंड ४था, महाराष्ट्र कोशमंडळ, पुणे.
धनपलवार, माणिक, १९८०, 'रंगोकृष्णकृत चंद्रहासोपाख्यान', शरद धनपलवार, हैदराबाद.
धनपलवार, माणिक १९९७, 'दाक्षिणात्य साहित्य संस्कृतीचा मराठीशी अनुबंध, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई.
पेवरिम जगन्नाथम् आणि रव्वा श्रीहरि, १९९५, 'आरे भाषा निघंटुवु', तेलुगु विद्यापीठ, हैदराबाद ५०००0४.
प्रियोळकर, अ.का. १९७८, 'रघुनाथ पंडितविरचित दमयंती-स्वयंवर' व्हीनस प्रकाशन, पुणे.
भावे, वि.ल. (शके १८७३) १९५१, महाराष्ट्र सारस्वत, विश्वकर्मा मुद्रणालय, पुणे.
महाडिक, कृष्णस्वामी, १९५८, 'सर्फोजीकृत कोर्व्यांचे साहित्याचे जिन्नस,' सरस्वती महाल ग्रंथालय, तंजावूर. ■

३-४-१०१३/१९ बरकतपुरा, हैदराबाद, 500027. दूरध्वनी 040-2756128

## चुकीची दुरुस्ती

'भाषा आणि जीवन'च्या हिवाळा २००६ (अंक २४:१) '...आणि समाधान' या टिपणात पृ. ६०, वरून पहिल्या ओळीतील 'मलीन, मलीनता, मालीन्य' हे उदाहरण चुकले आहे, ते अगोदरच्या 'कठिन' प्रमाणेच 'मलिन, मलिनता, मालिन्य' असे पाहिजे. चूक ध्यानात आणून दिल्याबद्दल पत्रिकेचे जागरूक वाचक डॉ. मनोहर राईलकर यांचे आभार.

पुढील ४ व ५ या ओळींत तरुणाई, तरणीताठी मुलगी, तरूणपणी (परंतु : तरुण, क्षम्य : तरुणपणी) असे हवे. ७व्या ओळीत 'माळीणपणा' ऐवजी 'मळीणपणा' असे हवे.

—अशोक रा. केळकर, पुणे










# माध्यमे भाषा घडवू(ही) शकतात !

उज्ज्वला बर्वे

मराठी प्रसारमाध्यमे मराठी भाषेच्या वापराबाबत फार काटेकोर नाहीत, त्यामुळे मराठी भाषेवर वाईट परिणाम होतो अशी ओरड वरचेवर ऐकायला येते. वर्तमानपत्रांत त्यासंबंधी लेख/वाचकांची पत्रे प्रसिद्ध होतात. मराठी भाषेच्या संबंधात होणारी बहुतेक सर्व चर्चासत्रे/परिसंवाद यांत माध्यमांची भाषा यासंबंधी एक सत्र राखून ठेवलेले आढळते. त्यामधील सूर प्रामुख्याने माध्यमे भाषेची कशी मोडतोड करत आहेत, त्या भाषेचा सर्वसामान्य मराठी भाषकांच्या भाषेवर कसा विपरीत परिणाम होत आहे, माध्यमांनी जाणीवपूर्वक त्याबाबतीत पुढाकार घेतला पाहिजे आणि भाषाशुचितेचे पालन केले पाहिजे असा असतो. त्यातल्या त्यात दिलासा देणारी बाब अशी की अशी चिंता फक्त मराठीच्या बाबतीत नव्हे तर जगाच्या विविध भागांतील अनेक भाषांच्या संदर्भात व्यक्त होत आहे.

प्रत्यक्षात माध्यमे (फक्त मराठीच असे नव्हे, तर जगातील कुठलीही) अशी भाषाभिमुख भूमिका घेतात का, भाषेचे जतन आणि संवर्धन यांसाठी ते प्रयत्न करतात का, करत असल्यास कशा प्रकारचे प्रयत्न करतात आणि त्या प्रयत्नांना यश मिळते का हे अभ्यासणेही महत्त्वाचे आहे. संज्ञापन आणि वृत्तपत्रविद्या विभागातील अध्यापक म्हणून माध्यमांकडे असलेल्या भाषाप्रसाराच्या सामर्थ्याची जाणीव विद्यार्थ्यांना करून देण्यासाठी मी इंटरनेटवरून त्यासंबंधीचे काही संदर्भ शोधण्याचा प्रयत्न केला. त्यातून उपलब्ध झालेली माहिती प्रेरणादायी व मार्गदर्शक आहे.

अमेरिकेतील काही मूळच्या नागरिकांची (ज्यांना सुरुवातीला इंडियन असे संबोधले गेले व आता त्यांचा उल्लेख अमेरिंडियन असा केला जातो) मूळ भाषा नावहो (navajo ) ही आहे. त्या भाषेच्या संवर्धनासाठी नभोवाणी या माध्यमाचा कसा उपयोग करून घेतला गेला याचा मागोवा लेटन पीटर्सन या संशोधकाने 'नावहो भाषेतील नभोवाणी: स्थानिक भाषेच्या जतनात नभोवाणीचे स्थान' (ट्यूनिंग इन्टु नावहो: दि रोल ऑफ रेडिओ इन नेटिव्ह लँग्वेज मेंट्नन्स) या संशोधनलेखात घेतला आहे.

नावहो भाषा बोलणाऱ्या समाजाच्या पारंपरिक किंवा त्या विशिष्ट समाजाशी निगडित अशा भाषिक व्यवहारांच्या गरजा ती भागवू शकत होती. पण जसजसे आदिवासी अमेरिकन लोक आधुनिक समाजाचा घटक बनले, तसतशी त्यांना वेगवेगळ्या, पारंपरिक नावहो भाषिक समाजाला अपरिचित असलेल्या घडामोडी व्यक्त करू शकणाऱ्या शब्दांची गरज भासू लागली. ते शब्द परभाषेतून जसेच्या तसे स्वीकारायचे, मूळ भाषेत असलेल्या शब्दांचे नवीन उपयोग रूढ करायचे किंवा मूळ भाषेतील शब्दांच्या संहतीतून नवीन शब्द तयार करायचे असे पर्याय नावहो भाषकांसमोर होते.

केटीएनएन् या नभोवाणी केंद्राने दुसरा पर्याय स्वीकारला. अगदी सुरुवातीला क्रीडासामन्यांचे धावते वर्णन नावहो भाषेत सादर करून केटीएनएन् या नभोवाणी वाहिनीने नावहो भाषेतील शब्दांचे नवीन उपयोग शोधून काढले. भाषेला आणखी आधुनिक बाज द्यायला बातमीपत्रे आणि इतर वृत्ताधारित कार्यक्रमांची मदत झाली. सातत्याने असे प्रयत्न झाल्यामुळे कालांतराने बोली नावहोपेक्षा नभोवाणीची नावहो भाषा अधिक नेमकी आणि समर्पक होत गेली.

नावहो भाषेतील कार्यक्रम श्रोते काळजीपूर्वक ऐकतात आणि कार्यक्रमांच्या भाषेकडे त्यांचे काटेकोर लक्ष असते, असा केटीएनएन् नभोवाणी वाहिनीसाठी काम करणाऱ्या निवेदकांचा अनुभव आहे. चुकीची भाषा वापरणाऱ्या निवेदकांवर टीकेचा भडिमार होतो हे खरे आहे, पण अचूक भाषा बोलणाऱ्यांचे श्रोते कौतुकही करतात. त्यामुळे निवेदक अधिक काळजीपूर्वक भाषा वापरतात. भाषेच्या वापरासंबंधी काही शंका आल्यास ते नावहो भाषा आयोगाचा, तज्ज्ञांचा किंवा श्रोत्यांचासुद्धा सल्ला घेतात.

नावहो भाषेच्या बाबतीत नभोवाणी या माध्यमाने एवढे लक्षणीय काम केले आहे की नावहो भाषिक बालकांना त्यांची भाषा शिकवायला नभोवाणीचा उत्तम उपयोग होऊ शकतो असे पीटरसन यांना जाणवले. नावहो भाषेतही प्रादेशिक भेद आहेत. पण आधुनिक काळात या भाषेचे संवर्धन करायचे असेल तर नावहो अधिक सुसंघटित, प्रमाणित व्हायला हवी. त्यासाठी सर्वांना मान्य असलेल्या शब्दांची सूची बनविणे, निवेदकांना नोकरीवर घेताना किंवा नोकरीत कायम करताना त्यांची कसून भाषिक (नावहो व इंग्रजी या दोन्ही भाषांची) चाचणी घेणे, भाषेसंबंधी श्रोत्यांनी केलेल्या तक्रारींची गंभीर दखल घेणे आणि त्या तक्रारींचा पुढील नियोजनासाठी उपयोग करणे असे उपाय संशोधकाने सुचवले आहेत. नावहो भाषेचे जतन हे महत्त्वाचे काम आहे हे लोकांना पटवून देऊन ते सातत्याने करता यावे यासाठी मोठा निधी उभा करावा अशी सूचनाही त्यांनी केली आहे.





अनुक्रमणिका

स्कॉटलंडमधील गेलिक या प्राचीन भाषेच्या बाबतीतही नावहोसारखीच परिस्थिती निर्माण झाली होती. गेलिक ही ज्यांची मातृभाषा आहे अशांचे इंग्रजी भाषेवरही तेवढेच प्रभुत्व असल्याने आधुनिक संकल्पना समजावून घ्यायला त्यांना गेलिकचा आधार घ्यावा लागला नाही. त्यामुळे गेलिकचा वापर हळूहळू कमी होऊ लागला. गेलिकच्या पुनरुज्जीवनाचे अनेक प्रयत्न झाले. गेलिक माध्यमाच्या शाळा, महाविद्यालये काढणे, गेलिक भाषकांच्या समुदायात सर्व व्यवहार गेलिक भाषेत करणे अशा उपायांचा त्यात समावेश होता. प्रसारमाध्यमांनी गेलिक भाषेचा वापर करणे हा उपायही हाताळला गेला. नभोवाणीच्या बाबतीत तो प्रभावी व उपयुक्त ठरला. कारण गेलिक बोलणाऱ्यांच्या बाबतीत हळूहळू अशी परिस्थिती निर्माण झाली आहे की गेलिक ऐकायचे असेल तर ते प्रत्यक्ष कुणाशी बोलताना ऐकता येत नाही. ते कानांवर पडले तर नभोवाणीद्वाराच पडते.

गेलिक वार्तांकनभाषा जाणीवपूर्वक हळूहळू कशी विकसित केली गेली याची रंजक माहिती विल्यम लँब यांच्या 'गेलिक वार्तांकन-भाषेच्या ऐतिहासिक विकासाचा ताळेबंद : भाषेच्या या उपप्रकाराचा विकास आणि विस्तार' या अहवालात आढळते. १९३५ साली बीबीसीने गेलिक भाषेतील कार्यक्रम प्रसारित करायला सुरुवात केली, १९३९पासून नियमित बातमीपत्रेही सुरू झाली. नभोवाणीसारख्या, एकाच वेळी अनेकांपर्यंत पोचणाऱ्या माध्यमात भाषा वापरताना हळूहळू जाणीवपूर्वक पोटभाषांतील शब्दांचा वापर टाळण्यात आला व प्रमाण-भाषा वापरण्याचा प्रयत्न सुरू झाला. सुरुवातीला गेलिक शब्द वापरला तरी त्याचा नेमका अर्थ कळावा म्हणून वरचेवर इंग्रजी शब्दांचा आधार घ्यायला लागत असे. कालांतराने जशी नभोवाणीची गेलिक भाषा तयार झाली आणि गेलिक शब्द भाषेत रुळले तशी ही पद्धत बंद करण्यात यश आले. गेलिकच्या विकासातील हा महत्त्वाचा टप्पा ठरला.

बातम्यांना नभोवाणी-प्रसारणात मध्यवर्ती स्थान असल्याने तसेच दर तासाला बातमीपत्रे प्रसिद्ध होत असल्याने भाषेच्या पुनरुक्तीचा तो सर्वांत मोठा स्रोत आहे. (श्रोत्यांच्या) शब्दसंपदेवर प्रभाव टाकणारा तो सर्वांत मोठा घटक आहे असे मानायला हरकत नाही. कारण (भाषा) शिकताना पुनरुक्तीचा लोकांच्या स्वत:वर भाषेवर नकळत का होईना परिणाम होतो.

इराक आणि इतर आखाती देशात विखुरलेल्या कुर्दिश भाषकांना एकत्र आणण्याचे, आणि ती भाषाही जिवंत ठेवण्याचे काम चित्रवाणी या माध्यमाने कसे केले तेही पाहण्यासारखे आहे. सुमारे शंभर वर्षांपूर्वी कुर्दिस्तानचे विभाजन झाल्यानंतर कुर्दिश भाषक वेगवेगळ्या देशांत विभागले गेले. त्यामुळे आजपर्यंत प्रमाणकुर्दिश भाषा

तयार होऊ शकलेली नाही. तसेच विभाजनानंतर जन्मलेल्या पिढ्यांना कुर्दिश वापरण्याची गरज न राहिल्याने ही भाषा कालबाह्य होऊ लागली. पूर्व, पश्चिम आणि उत्तरेकडे बोलली जाणारी कुरमानजी आणि दक्षिणेकडे बोलली जाणारी सोरानी या भाषा कुर्दिश भाषेचीच रूपे आहेत. या दोन रूपांमधील दरी दूर करण्याचे काम 'मेद्या टीव्ही' या वाहिनीने केले.

तुर्कस्तानमध्ये ही भाषा बोलण्याला बंदी होती, तिथे या भाषेचा स्वीकार कुर्दांनी करावा यासाठी तर इराक, इराणमध्ये भाषा बोलली जायची. पण त्यामुळे तिची वेगवेगळी रूपे, बोलीभाषा अस्तित्वात आल्या होत्या. त्या सर्वांना एकत्र आणण्यासाठी वाहिनीचा उपयोग झाला. फक्त चित्रवाणी या माध्यमाच्या भाषेचे नव्हे तर सामान्य माणसांच्या दैनंदिन वापराच्या भाषेचे काही नियम ठरवण्यात आणि त्यांचा प्रसार करण्यात आणि कुर्दी लोकांमधील प्रत्यक्ष आणि भाषिक अंतर कमी करण्यात या वाहिनीला यश आले आहे. आपल्या पोटभाषेखेरीज इतर कुर्दिश पोटभाषांमधील कार्यक्रम बघण्यात लोकांना रस वाटू लागला आहे. आपणही कुर्दिश आहोत असा शोध अनेकांना अशा विविध पोटभाषांमधील कार्यक्रमांमुळे लागला आहे. खरे नव्हे तरी किमान आभासी (व्हर्च्युअल) कूर्दिस्तान या वाहिनीमुळे स्थापन झाले आहे असे आता कुर्दी भाषकांना वाटते.

माल्टा या लहानशा देशातही माल्टी ही भाषा जिवंत आणि रसरशीत ठेवण्यासाठी आटोकाट प्रयत्न चालू आहेत. इतर भाषांचे माल्टी भाषेवर होणारे आक्रमण, भाषेच्या वापराबाबत वाढत असलेली बेफिकिरी यांचा गंभीर विचार 'ब्रॉडकास्टिंग अथॉरिटी ऑफ माल्टा' या संस्थेने केला आहे. तसाच प्रयत्न जपान-मधील एन्एच्के ही माध्यमसंस्था सातत्याने गेली अनेक वर्षे करत आहे. या संशोधनाचे फलित म्हणून शब्दांचे, उच्चारांचे कोश तयार झाले आहेत. माध्यमानुकूल शैली निश्चित करून कार्यक्रम आकलनसुलभ होण्यासाठी मार्गदर्शक नियम आखले गेले आहेत.

मराठीच्या बाबतीत बोलायचे तर माध्यमांच्या भाषेचे संशोधन करण्याची जबाबदारी भाषावैज्ञानिक उचलतील, भाषासंवर्धनाचे, चुका कमी करण्याचे मार्ग सुचवतील, नवनवीन संकल्पनांसाठी समर्पक शब्द सुचवतील, माध्यमांना शक्य ती सर्व मदत करतील; पण माध्यमांना त्यांच्या जबाबदारीची जाणीव कुणी व कशी करून द्यायची हा खरा प्रश्न आहे. ■

संज्ञापन आणि वृत्तपत्र-विद्या विभाग, पुणे विद्यापीठ

# 'बांधू शब्दार्थांच्या गाठी...'

विद्यागौरी टिळक

मध्यंतरी एक बातमी वाचली. जपानमध्ये छोट्या बाळांच्या चीत्कारांचा, रडण्या-ओरडण्याचा अर्थ लावणारी यंत्रणा विकसित केली जात आहे. तीन-एक वर्षांपूर्वी असंच कुत्र्यांच्या भुंकण्याचा अर्थ लावणारं 'बाउलिंग्वल' नावाचं साधन विकसित झालं आणि म्हणे कुत्र्यांच्या मालकांमध्ये ते लोकप्रियही झालं. (कुत्र्यांचं काही कळायला मार्ग नाही !)

ती 'बाउलिंग्वल' यंत्रणा विकसित करायला पुरेशी अचूक माहिती जपानी मंडळींनी मिळवली हेही आश्चर्यच ! जपानी लोक म्हणे सामाजिक संकेतांना शिरोधार्य मानून शिस्तबद्ध वागणारे असतात. तिथले कुत्रेही बहुधा आपल्या मालकांचाच कित्ता गिरवणारे असावेत. समजा, त्यासाठी इथे सर्वेक्षण केलं असतं तर ते यशस्वी झालं असतं का ? त्याबद्दलच्या काही अनुभवांवरून शंकाच वाटते.

म्हणजे उदाहरणार्थ, खास शत्रुपक्षासाठीचा ठेवणीतला भुंकण्याचा आवाज आपल्या कुत्रोबांनी काढलाय म्हणून आपणही उंदराचा जरा समाचार घ्यावा, अशा इरादानं दबकत काठीसह खोलीत शिरावं. आणि आत गेल्यावर शत्रुस्थानी उंदीर वा घुशीऐवजी भिंतीशी उभा एक कानवाला पोळपाट किंवा नवं गजराचं घड्याळ दिसावं. काय भाषांतर करणार दगड त्या ठेवणीतल्या आवाजातील भुंकण्याचं ?

अर्थात्, ज्या गोष्टी सरधोपट पद्धतीनं सांगितल्या जात नाहीत, त्याविषयी समजून घेण्याची जिज्ञासा माणसाला वाटते आहे, हे बरं आहे एका परीनं ! व्यावहारिक उपयुक्ततेविषयी तर बोलायलाच नको. एरवी आपलं 'लाडकं' कशावरून किरकिर करत बसलेलं आहे, हे ओळखण्यात तर्कबुद्धीची एकेकदा फारच कसोटी लागते. याबद्दलचे काही संस्मरणीय अनुभव माझ्या गाठीशी आहेत.

बोलायला शिकायच्या अवस्थेत असताना चिरंजिवांनी मला शिकवलेला धडा अमूल्यच होता. सकाळी खीर प्यायच्या रिवाजानुसार पोर पाटावर बसलं. बशीत खीर ओतून त्याच्या तोंडासमोर नेली. त्याचं म्हणणं : 'तातातातानी...' म्हणजे काय ?.. गरम लागली वाटतं... घाला फुंकर, ढवळा... तरी पुन्हा तोच धोशा. 'साखर कमी झाली का ?' 'नाई ! तातातातानीऽ'... फार गोड झाली का, दूध घालू का ?..'

'भूक नाही का ?'... 'थोड्या वेळानं ?... माझ्या एकेका तर्कानिशी त्याचं तोंड रडून, चिडून लाल होत चाललेलं. ओरडण्याचं किंचाळण्यात रूपांतर व्हायला लागलेलं. हा गोंधळ काही मिनिटे तसाच चालला. खीर पिण्याच्या वेगावरून भूक लागलीय हे उघडत होतं. पण रडणं थांबेना. त्याच्या बाबानं, आजीनं आपल्या परीनं प्रयत्न केले. कशाचाच परिणाम नाही. 'तातातातानीऽऽ' म्हणजे काय, याचा पत्ता लागेना. शेवटी एकदम डोक्यात आलं - 'स्वतःच्या हातांनी का ?' 'हूऽऽ' - 'खीर संपता संपता हे तुम्हाला कळावं का ?' अशा संतापामुळे आलेल्या हुंदक्यासकट हुंकार !

भाषिक विकास कोणत्या टप्प्यांनी होतो... नामं... मग साधी क्रियापदं इ. इ. ऐकीव/वाचीव ज्ञान धारातीर्थी पडलं आणि भाषा-संपादनाची प्रक्रिया आपण समजतो त्यापेक्षा फारच अद्‌भुत असते, अशी मी मनाशी खूणगाठ बांधली.

दुसरा प्रसंगही असाच. त्याच सुमाराचा. जावळ काढण्याचा. घरातलीच माणसं आणि चांदीची कात्री वगैरे सरंजामानिशी आलेले कारागीर. आधी मुलगा आपलं कौतुक चाललंय म्हणून आनंदात होता. पण कात्री डोक्याला लागल्याबरोबर रडायला सुरुवात झाली. सगळी इमारत रडण्यानं दणाणली. जावळ काढेपर्यंत त्याला दोघांनी जबरदस्तीनं पकडून धरावं लागलं.

शेवटी त्याची सुटका झाली तरी रडणं थांबेना. डोकं पाहिलं तर कुठे काही लागलं-कापलं, अशीही स्थिती दिसेना. 'जावळ काढताना मुलं रडतातच,' असं ऐकिवात होतं; पण त्यामागच्या कारणाबाबत कुणी काही बोललं नव्हतं, आणि किती वेळ रडतात आणि काय केल्यानं थांबतात अशी चौकशी करून ठेवण्याएवढा बाका प्रसंग ओढवेल, असं मला वाटलं नव्हतं. शेवटी कडेवर घेऊन हिंडत हिंडत 'फॉर दुखलं का रे ? लागलं का कुठे ?' अशी चौकशी सुरू केली. सगळ्याला नकारार्थी मान हलतेय, पण रडण्याचं कारण कळेना. रडणंही थांबेना.

मग 'केस कापले म्हणून रडतोयस का ?' याला होकार मिळाला. 'तुला काय वाटलं पुन्हा येणार नाहीत ?' यावर एकदम प्रतिसाद आला. मग काय 'अरे माझेसुद्धा कापले होते, बघ आलेत की नाही पुन्हा!' असं अगदी आपल्या आठवणीतली परवाची गोष्ट असल्याच्या थाटात त्याला सांगितलं. प्रत्येकासमोर जाऊन त्यांचेही केस कापलेच होते आणि पुन्हा आलेत, असं पटवायला लागल्यावर रडणं खाडकन् थांबलं. रडण्यामागे इतका लौकिकातला कार्यकारणभाव गवसावा, याचाही आनंद मला झाला.

मात्र अशी कोडी प्रत्येकवेळी सुटलीच असं नाही. थोडं बोलता यायला लागल्यावर रिक्षाजवळून जाताना त्यानं 'अतिलेकी लिक्षात बैस' असं काहीसं म्हणत त्या दिशेला झेप घेतली होती. असंच काहीसं वाक्य दोन-तीनदा त्याच्या बोलण्यात आलं होतं.

रिक्षात बसून पळालेल्या अतिरेक्यांची बातमी त्यानं ऐकली असा एक अंदाज आणि दुसरीकडे 'हात् तेरेकी' हे उद्गारवाचकही ऐकलं असावं अशीही शक्यता. त्यांचं एकत्रीकरण त्यानं केलं होतं की काय आणि त्याचा अर्थ बापड्यानं काय लावला होता, दोन्ही उमगणं शक्य नव्हतं.

याच्या खूपशी आधीची आठवण मात्र काहीशी वेगळीच आहे. बोलता येत नसतानाही भाषेचा खुंट कसा, किती काम करत असतो, हे सांगणारी !

मुलगा सहा-एक महिन्यांचा असेल. त्याला घेऊन मी माहेरी गेलेली होते. एरवी मी कामासाठी बाहेर पडल्यावर त्याच्याकडे बाबा आणि आजी पाहायचे. त्यामुळे त्याला त्यांची सवय ! तिथे त्याला अधूनमधून त्यांची आठवण आली की साहजिकच रडणं सुरू व्हायचं. मग त्याला घेऊन गच्चीवर फेऱ्या घालता घालता माझा एकपात्री संवाद चालायचा. 'आपण काही दिवसांसाठीच आलोत. पुन्हा अमुक दिवसांनी घरी जाणार आहोत... इ.इ.' त्याचा बाबा 'आमचे छोटे... चिंगू शेठजी' अशी काहीतरी मोठी बिरुदावली त्या वेळी त्याच्यासाठी वापरायचा. 'बाबा कसं म्हणतो...' म्हणून मी ते सगळं उच्चारायची.

आम्ही परत आलो तेव्हा बाबा समोर आल्यावर त्याला चेहऱ्याची ओळख चटकन पटेना. तो तोंड फिरवायला लागला. पण बाबानं खुणेची परवल उच्चारताच त्याचे हात एकदम पुढे झाले आणि डोळ्यात भेटीचा आनंद आणि मधल्या दुराव्याच्या रुसव्याचं हसूरडू एक झालं. आपण केलेली बडबड एकतर्फी नव्हती, या पावतीनं मला धन्यधन्य वाटलं.

अपत्यं भाषा शिकण्याच्या वयात असतानाची ही कोडी काहीवेळा उभयपक्षी तापही देतात. काही वेळा अनपेक्षित असे साक्षात्कारही त्या वेळी घडत असतात. पुढे यथावकाश भाषा नीट हाताशी आली की मग मात्र साधारणपणे जगरीतीनुसार वहिवाटीच्या रस्त्यानंच संभाषणं सुरू होतात. म्हणजे भाषा शिकण्याच्या टप्प्यात 'आपण गप्पा मारुयात' म्हणणारं अपत्य गोष्टीचं पुस्तक वाचण्यात व्यत्यय नको म्हणून कान अक्षरशः बंद करून घेतं आणि पसाभर शब्द पुरत नाहीत असं पाहून आई चेवानं पायलीभर शब्द ओतत राहते... चक्रीय परिणाम साधत वाटचाल पुढे चालू...

संवादाचं माध्यम पक्कं हातात आलं की प्रत्यक्ष संवादाबद्दलच्या संवेदना हळूहळू बोथट होत जातात की काय कोण जाणे ! त्या जपानी उपकरणांच्या मालकांना या प्रश्नाचं उत्तर नेमकं कळलं असेल का ? कुत्र्यामांजरांना कळलं असलं तरी त्या 'बाउलिंग्वल माउलिंग्वल'वर त्याची नोंद होणं अशक्यच आहे. ■

मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे 411007

# आर्याचा भाषाविकास

जयश्री काटीकर

आमची आर्या आता जवळजवळ दोन वर्षांची झाली आहे. अगदी अचूक सांगायचं तर एक वर्ष दहा महिने. आर्याचा भाषाविकास अनुभवणं हा माझ्यासाठी एक विलक्षण अनुभव ठरतोय. आर्याच्या निमित्ताने मला आलेले तिच्या भाषाविकासाचे अनुभव प्रकटपणे मांडावे असं वाटलं म्हणून हा लेखप्रपंच. भाषा, तिच्यातले शब्द, त्या शब्दांची बनलेली वाक्यं, त्या वाक्यांतील शब्दांमधला कार्यकारणभाव या सगळ्यांची मुलांच्या एवढ्याशा मेंदूत काय आणि कशी सुसंगती-विसंगती लावली जात असेल ! कुठल्या तर्काच्या आधारे मूल भाषा शिकत असेल ! या विचारानं कधी कधी अचंबित व्हायला होतं.

- सुरुवातीला केवळ डोळ्यांची, नजरेची, हातवाऱ्याची आणि अगाध, अवर्णनीय उच्चारांची असणारी भाषा दे-दे, दा-दा, पा-पा, बा-बा, मा-मा अशी एकवर्णीय मराठी भाषा बनते. मग बाबा, दुद्दू, टाटा, आई अशी द्विवर्णीय बनत जाते. आर्या दीड वर्षाची असताना दोन-तीन वर्णांचे ७०-७५ शब्द तिला येत होते. त्यानंतर महिन्याभरात २-३ शब्दांची वाक्ये, गाण्याच्या ओळी ती बोलायला लागली. ही वाक्यं म्हणजे विभक्ती-प्रत्यय नसलेले आगगाडीचे नुसते डबेच्या डबेच... एकापुढे एक केवळ मांडलेले : बाबा भूभू हात... बाबा भूभूला हात करायला (बाहेर) गेले आहेत... एवढा सगळा अर्थ या तीन शब्दात भरलेला.

| | |
|---|---|
| आई आंघोळ झाला. | माझी शहाणी आई. |
| येरे येरे पावसा. | मोरा मोरा काय मोरा... वगैरे वगैरे. |

- पालथं पडणं, पुढं सरकणं, रांगणं, बसणं, उभं राहणं, पाऊल टाकणं हे जसे शरीराच्या वाढीचे टप्पे आहेत तसे भाषाविकासाचेही टप्पे आर्यामुळे लक्षात येऊ लागले. वाक्य बोलायला लागतानाही आधी आपण गाणं म्हटलं की शेवटचा शब्द आर्या उच्चारत असे. येरे येरे असं आपण म्हटलं की ती 'पावसा' म्हणणार. नंतर येरे येरे पावसा असं आपण म्हटलं की 'तुला देतो पैसा' अशी पुढची आख्खी








ओळ ती म्हणणार. हा चेंडू कोणाचा ? असं विचारल्यावर आधी नुसतं 'आर्या' असं उत्तर मिळायचं, मग 'आर्याचा' आणि नंतर 'माझा' असं उत्तर मिळू लागलं.

- आधुनिक भाषाविज्ञान म्हणतं की आपण बोललेलं दुसऱ्याला कळणं महत्त्वाचं. बाकी शुद्ध-अशुद्ध, बरोबर-चूक याला फारसं महत्त्व नाही. त्यामुळे आपल्याला विभक्ती-प्रत्यय, सर्वनामं, क्रियाविशेषणं आधी बोलता आली नाहीत तरी चालतील, पण आपल्या आईला, बाबाला आपण जे बोलतोय ते कळण्यासाठी सुरुवातीला आपण नाम हीच शब्दाची जात शिकूया असं कसं कळलं असेल आर्याला ? इतक्या लहान, न कळत्या वयात टप्प्याटप्प्यानं शिकणं कसं जमत असेल ? भाषा शिकण्याची शक्ती उपजत असते हेच खरं का ?
- स्वर उच्चारायला अवघड असतात असं म्हणतात. पण आर्या मात्र आर्या, आई हे अवघड शब्द लवकर बोलायला लागली.
- तसं पहायला गेलं तर मराठी भाषेत आर्यानं मोलाची भर घातलीय. आख्खं एक क्रियापद तिने भाषेला बहाल केलंय. 'आई, बाबा मला वाचव ना !' दिसेल ते, हाताला लागेल ते पुस्तक घेऊन हे वाक्य असंख्य वेळा ती उच्चारते. गोष्टीपेक्षा पुस्तकातली चित्र-वर्णनं ऐकायला आर्याला खूप आवडतं. म्हणून वाचून दाखव या गोड क्रियापदाऐवजी 'वाचव' असं नवीन क्रियापद तिचं तिने तयार केलंय. बहुतेक 'वाचाल तर वाचाल' हे तिला पक्कं ठाऊक दिसतंय.
- आर्याकडे बंटी नावाचा बाहुला आणि बबली नावाची बाहुली आहे. बबलीची केश-वेशभूषा विस्कटेल म्हणून ती आर्याच्या वाट्याला क्वचितच येते. बंटी मात्र सतत असतो तिच्यासोबत. त्या दिवशी बंटीसोबत खेळताना 'बंटी हसली, बंटी उठली' असे संवाद चालले होते. लगेच तिची दुरुस्ती करण्यासाठी मी, हो का, उठला का बंटी, हसला का बंटी असं पुरुषवाचक क्रियापदावर जोर देऊन विचारत होते. तात्काळ तिची चूक तिच्या लक्षात आली. आपल्या वाक्यरचनेत सुधारणा करून ती 'बंटा उठला, बंटा हसला' असं म्हणू लागली. स्त्रीलिंगी विशेषनामे इकारान्त आणि पुरुषवाचक विशेषनामं ही बहुधा आकारान्त असतात, हे तिला कळलं असेल ? काय संगती लावली असेल तिनं यामागे ?
- आर्याशी आमची अखंड बडबड सुरूच असते. त्यामुळे तिचा शब्दसंग्रहही बऱ्यापैकी वाढलाय. आंघोळीच्या वेळी आर्याची बादली कशी भरलेली असते, असं विचारल्यावर 'काठोकाठ, ओतप्रोत, तुडुंब' असं मी सांगते. या ठरावीक शब्दांचं उपयोजन प्रत्यक्ष वापरात ती केव्हा करेल, ते नक्की सांगता येत नाही. पण लवकरच दुधाचा भरलेला कप पाहून यातील एखादा शब्द ती उच्चारेलही.





अनुक्रमणिका

- आर्याला आता आता गोष्टी बघण्यात/ऐकण्यात रस वाटू लागलाय. कारण गोष्टी आता तिला कळू लागल्यात. इतके दिवस संगणकावर, टेपवर ती केवळ गाणीच बघायची/ऐकायची. गोष्टी लावल्या की तिचं त्याकडे लक्ष नसायचं. पण आता आवर्जून श्रीरामाची गोष्ट लाव, दादाचा पिक्चर (होम अलोन २) लाव असं सांगते. काळाचं भान आल्याचं हेच लक्षण असेल का ? 'चित्रपट पाहतानाही चोर आला, दादा पडला' इ. टिप्पणी तिची चालूच असते. आर्याची भाषा समृद्ध होते आहे असे समजायचे का ?
- मासिकावरचं (बाईचं) चित्र दाखवून ही मावशी आहे, काकू आहे, आत्या आहे की ताई आहे, असं विचारलं. म्हटलं, बघू या कोणाशी साधर्म्य जोडतेय ! पण माझे सगळे पर्याय डावलून आर्या उत्तरली, 'ही बाई आहे.'
- एखादी नवी संकल्पना, नवा शब्द सांगताना त्रेधा उडते. नक्की काय सांगावं संभ्रम पडतो. बरं, आपण बोललेलं तिला समजतंय का, याचीही तत्काळ प्रचीती आपल्याला मिळत नाही. पण परवा अशी प्रचीती तत्काळ मिळाली. रेल्वे स्टेशनवर गेलो होतो, तेव्हा मालगाडी होती. मालगाडी म्हणजे काय सांगायचं? असा विचार करून, या गाडीतून ताई-दादा दिसतात का ? प्रवासी दिसतात का ? ते प्रवास करतात का ? नाही ना ! या डब्यांना खिडक्या नाहीत, दारं नाहीत, त्याला मालगाडी म्हणतात. त्यातून मालाची ने-आण करतात, सामान आणतात-नेतात. पण परत या सामानाची फोड कशी करायची ? मग म्हटलं यातून गहू, तांदूळ, वगैरे वगैरे नेतात, तेव्हा ती म्हणाली, 'जाम नेतात.' (पोळी बरोबर खायचा), म्हटलं जिंकली. आपण जे बोलतोय ते आर्याला कळतंय.
- नवीन ऐकलेले/शिकलेले शब्द आर्याच्या व्यवस्थित लक्षात असतात. त्या शब्दांचा वापरही ती बऱ्यापैकी करते. पण कधी कधी आपल्याला अनपेक्षित ठिकाणी एखाद्या शब्दाचा वापर झाला की मात्र हसू लोटतं आणि तिच्या हुशारीचं कौतुकही वाटतं. काही उदाहरणं -

(१) पाटीवर तिनं वेटोळा काढलेला मासा गुलाबजाम खातो. (२) डाळिंबाचा दाणा चिमटीत पकडून ती त्याचा फटाका फोडते. (३) घरातला हँगर हातात धरून त्याला बाण लावते. (४) कपाळावरचं कुंकू बोटाला लागलं की 'माझं बोट फिस्कुटलं' म्हणते. (५) पावडर हाताला लागली की तिचा हात 'खरकटा' होतो !

अशा एक ना अनेक गोष्टी. एक मात्र जाणवलं की तिची भाषा समृद्ध होत आहे, आणि आर्या आम्हालासुद्धा अनुभवसंपन्न करते आहे. ■

१,अध्यापक निवास,मूळजी जेठा महाविद्यालय,जळगाव 425002. दूरध्वनी 9422019385

# भाषावार प्रांतरचना आणि राष्ट्रीय एकात्मता

रामचंद्र गुहा

१९५०च्या प्रारंभी भाषावार प्रांतरचनेच्या विरोधकांमध्ये पंतप्रधान जवाहरलाल नेहरू आणि सरसंघसंचालक, मा.स.गोळवलकर यांचा समावेश होता. (नेहरू आणि रा. स्व. संघाचे प्रमुख यांचे एकमत होते असा हा एकमेव विषय असावा.) दोघांनाही भीती वाटत होती की भाषांवर आधारित राज्यांच्या निर्मितीतून पुढे भारताचे आणखी तुकडे पडतील. वस्तुतः याच्या उलटच घडले. भाषावार प्रांतरचनेतून भारतीय ऐक्याला बाधा तर नाहीच पोचली, उलट राष्ट्रीय एकात्मतेला बळच मिळाले. कन्नडिग आणि भारतीय असणे, बंगाली आणि भारतीय, तमिळ आणि भारतीय, गुजराती आणि भारतीय असे एकाच वेळी असणे हे पूर्णपणे सुसंगत राहिले आहे.

अर्थात, ही भाषा-आधारित राज्ये काही वेळा परस्परांशी भांडतात. म्हणजे माझ्या स्वतःच्या कर्नाटक राज्याचे कावेरीच्या पाण्यासाठी तामिळनाडूशी भांडण चालू आहे; बेळगाव शहरावरून महाराष्ट्राशी वाद चालू आहे. हे वाद लहानसहान नसले तरी ते विकोपाला जाऊ शकले असते, तसे ते गेले नाहीत हेही खरे आहे. १९५६ या वर्षीच राज्य पुनर्रचना समितीने भारताच्या नकाशाची भाषिक आधारावर पुनर्रचना करण्याचा आदेश जारी केला. सिलोनच्या (श्रीलंकेच्या) लोकसभेने सिंहल ही देशाची एकमेव अधिकृत भाषा म्हणून जाहीर केली. उत्तरेच्या तामिळींनी जोरदार निषेध केला. एका डाव्या गटाच्या सिंहली खासदारांनीही जणू प्रेषिताप्रमाणे संघर्षवाद्यांना इशारा दिला- ''एक भाषा, दोन राष्ट्रे; दोन भाषा, एक राष्ट्र.'' या सुंदर बेटावर १९८३पासून जे यादवी युद्ध भडकले आहे त्याचे मुख्य कारण हेच आहे की भाषिक अल्पसंख्याकांचे हक्क भाषिक बहुसंख्याकांकडून नाकारले जात आहेत. भारताचा दुसरा शेजारी पाकिस्तान १९७१ साली विभाजित झाला; कारण पश्चिमेकडच्या पंजाबी आणि उर्दू भाषकांनी पूर्वेकडच्या बंगाली भाषकांची कदर केली नाही. भाषावार प्रांतरचनेमुळेच भारताला अधिक मोठे दुर्दैव टाळणे शक्य झाले आहे. तेलगू, मराठी आणि इतर सर्व भाषकांच्या भावनांची उपेक्षा झाली असती तर इथेही तेच घडले असते. ■

'दि हिंदू' जुलै २००६, अनुवाद - डॉ. सुप्रिया सहस्रबुद्धे



अनुक्रमणिका






विद्यापीठाच्या मराठी विभागाचे निवृत्त प्रमुख दत्ता भगत यांनी एके ठिकाणी लिहिले आहे, की 'सामाजिक अभिसरणाबद्दल अनुकूल भूमिका घेताना आम्ही मातृभाषेतून अध्यापन हवे, हा आग्रह वाजवीपेक्षा अधिक धरला. त्यामुळे इंग्रजीसारख्या महत्त्वाच्या भाषेतल्या शास्त्रीय ग्रंथांच्या अनुवादाचे काम आज जवळपास थांबले आहे. इंग्रजी ग्रंथांचा आधार घेत अध्यापन करणेही थांबले आहे... एका परीने मराठी भाषेला ज्ञानभाषा करण्याच्या अंगाने तिचा होणारा विकास आम्ही थांबवला आहे.''

यावर उपाय काय ? केवळ 'इंग्लिश स्पीकिंग क्लासेस' हा निश्चित नाही. एकंदरच इंग्रजीबाबतचे भय, तिरस्कार व मत्सर काढून टाकला पाहिजे. इंग्रजी सहज संभाषणाची भाषा व्हायला हवी.

■

दै. सकाळ, ७-१-२००७

## लेखकांसाठी सूचना

१. पुढील विषयांसंबंधीचे लेखन ''भाषा आणि जीवन''ला हवे आहे : मराठी व अन्य देशी-विदेशी भाषा, भाषाविज्ञान, भाषांतर, संशोधन, शैली, भाषिक वर्तन, भाषाविषयक शैक्षणिक, शासकीय इ० धोरणे, 'भाषा आणि जीवन'मधील लेखांसंबंधीच्या प्रतिक्रिया, पानपूरके.

२. लेखकांनी पुढील पथ्ये पाळावीत :
   (अ) कागदाच्या एकाच बाजूस, सुवाच्य लिहावे.
   (आ) लेखनाच्या पाकिटावर पुरेशी टपाल-तिकिटे लावावी.
   (इ) लेखाच्या अखेरीस स्वत:ची ओळख (शिक्षण, व्यवसाय इ०) एकदोन वाक्यांत लिहावी. त्याचप्रमाणे स्वत:चा पत्ता व ( इष्ट वाटल्यास ) दूरध्वनी क्रमांक द्यावा. (संपादकांच्या सोयीसाठी दूरध्वनी क्रमांक जरूर कळवावा.)
   (उ) लेखात इंग्रजी अवतरणांचे मराठी भाषांतर द्यावे. व्यक्तिनामे, ग्रंथांची व लेखांची शीर्षके इ० देवनागरीत लिहावी. (अतिशय अपरिहार्य अशाच ठिकाणी रोमन लिपीचा वापर करावा.)

३. लेखनासंबंधीचा निर्णय एक ते तीन महिन्यांत कळवला जातो. टपाल-तिकिटे जोडलेली असतील तर (आणि तरच) नापसंत लिखाण परत पाठवले जाते.

४. लेखनाला अल्प मानधन दिले जाते.

# मागचं-पुढचं

प्रशांत परदेशी

एका जपानी मित्राचा मला फोन आला व त्याने पुण्यातील त्याच्या (व माझ्या) मित्राला फोन अनेकदा लावला; पण काही केल्या लागत नाही, अशी तक्रार केली. मी त्याला लगेचच पुण्यातील नंबर नुकतेच बदलले असून, जुन्या नंबरच्या मागे दोन लावून फोन करायला सांगितलं. काही वेळानंतर त्या जपानी मित्राचा पुन्हा फोन आला व काही केल्या फोन लागत नाही. असं त्यानं मला सांगितलं. 'माझ्या घरून त्या मित्राला फोन लावून पाहतो', असं मी त्याला सांगितलं. मी लगोलग फोन लावून पाहिला तर ताबडतोब फोन लागला. मी पुन्हा त्या जपानी मित्राला फोन करून काही प्रॉब्लेम नाही, फोन लागतोय असं सांगितलं. नोंद करून घेण्यासाठी नवीन नंबर सांगितला. तो ऐकताच तो जपानी मित्र आश्चर्याने मला म्हणाला, की तू मला जुन्या नंबरच्या 'मागे' दोन लावाला सांगितले. मात्र, वास्तवात जुन्या नंबराच्या 'पुढे' दोन लावतोयस. मी म्हणालो, 'नाही'. जुन्या नंबराच्या 'डाव्या' बाजूस दोन लावणं याला मराठीत 'मागे' दोन लाव, असं म्हणतात. जपानी भाषेत याचा अर्थ बरोबर उलटा होतो. जुन्या नंबराच्या 'उजव्या' बाजूस दोन लावणं याला 'मागे' दोन लावणं असं म्हणतात. ध्वनिफितीमधील गाण्याचं वर्णन करतानाही हा गैरसमज निर्माण होतो. 'मागे' आणि 'पुढे' या स्थलनिर्देश संकल्पनांबद्दल माझं कुतूहल वाढतच गेलं. मला भाषा आणि स्थलसंकल्पना आकलन यामध्ये घनिष्ठ संबंध असल्याचं जाणवलं.

स्थलसंकल्पना आकलनासाठी संदर्भ चौकट/संदर्भ बिंदू हा महत्त्वाचा भाग आहे. डावीकडून उजवीकडे लिहीत जाताना डावीकडे असणाऱ्या गोष्टी 'मागे' पडत जात उजवीकडे येणाऱ्या गोष्टी 'पुढे' आहेत, असा चलत् दृष्टिकोण मराठी भाषकांमध्ये प्रामुख्याने आहे. त्यामुळे जुन्या नंबराच्या 'डावी'कडे म्हणजे जुन्या नंबराच्या 'मागे' असा अर्थ निघतो. जपानी भाषा ही पारंपरिक पद्धतीत उजवीकडून डावीकडे व वरून खाली लिहिली जाते; परंतु वर्तमानपत्र व दैनंदिन वापरात मराठी भाषेप्रमाणे डावीकडून उजवीकडे व आडवी लिहिली जाते. जपानी भाषक मराठी भाषकांच्या बरोबर विरुद्ध

म्हणजेच 'स्थिर दृष्टिकोणात' विचार करतात. स्थिर दृष्टिकोणात जुन्या नंबराची सर्वात डावीकडची बाजू ही 'सुरवात' असून, सर्वात उजवी बाजू हा 'शेवट' आहे. 'सुरवात' ही पुढची बाजू असून, 'शेवट' ही पाठीमागची बाजू आहे. यामुळे जुन्या नंबराच्या सुरवातीस म्हणजे नंबराच्या 'पुढच्या' बाजूला, असा अर्थ निघतो. मराठी भाषकांमधेही असा स्थिर दृष्टिकोण घेणारे लोक असल्याने त्यांच्या करिताही २ एक्स एक्स एक्स या नंबरातील दोन हा एक्स एक्स एक्स या जुन्या नंबराच्या 'पुढे' आहे, असा अर्थ होतो.

स्थलसंकल्पनेच्या आकलनामध्ये 'संदर्भ चौकट/संदर्भबिंदू' महत्त्वाचा आहे. असा विचार फार जुन्या काळापासून तत्त्वशास्त्रज्ञ, भाषाशास्त्रज्ञ, मानसशास्त्रज्ञांनी मांडला आहे. हॉलंडमधील मॅक्स प्लन्क इन्स्टिट्यूट फॉर सायकोलिंग्विस्टिक्स या संशोधन केंद्रातील भाषाशास्त्रज्ञ, मानसशास्त्रज्ञ, मानववंशशास्त्रज्ञ व मेंदूशास्त्रज्ञांच्या संशोधन गटाने जगातील सुमारे चाळीस (बहुतांशी लिपी नसलेल्या) भाषा बोलणाऱ्या भाषकांच्या स्थलसंकल्पना-आकलनाचा सुमारे पाच वर्षे अभ्यास केला. या संशोधनावर संशोधन-गटाचे प्रमुख प्रा. स्टेफान लेव्हिन्सन यांनी 'स्पेस इन लँग्वेज ॲण्ड कॉग्निशन' हे पुस्तक लिहिले. केंब्रिज विद्यापीठाच्या प्रकाशनातर्फे ते प्रसिद्ध झाले.

मानव व इतर प्राणी यांच्यातील सर्वांत मोठा फरक म्हणजे भाषेचे अस्तित्व. प्राणी फक्त दृष्टिपथात असणारे स्थळ म्हणजे 'येथे' व त्या वेळचा काळ म्हणजे 'आता' याचे आकलन करू शकतात. परंतु मानव अंटार्टिका, चंद्र, मंगळ असे दृष्टिपलीकडे असणारे 'स्थळ', तसेच दहा कोटी वर्षांपूर्वी यासारखा अनज्ञतन भूतकाळ, मागचा आठवडा, काल यासारखा नजीकचा भूतकाळ, उद्या, परवा, पुढच्या वर्षी यासारखा भविष्यकाळ यांचे सहजतेने आकलन करू शकतो. 'काल' ही अदृश्य संकल्पना मानव 'स्थळ' या दृश्य संकल्पनेच्या माध्यमातून सहजतेने समजू शकतो.

स्थलआकलनात 'संदर्भचौकट व संदर्भबिंदू'चं महत्त्वाचं स्थान आहे. संदर्भबिंदू घेण्याचे तीन प्रकार आहेत... (१) अंतर्भूत संदर्भचौकट, (२) सापेक्ष संदर्भचौकट आणि (३) निरपेक्ष संदर्भचौकट. सर्वांत प्रथम अंतर्भूत संदर्भचौकट पाहू. ट्रक, टीव्ही, घर यासारख्या वस्तूंना अंतर्भूतरीत्या 'पुढची' व 'मागची' बाजू असते. 'टीव्हीसमोर चष्मा ठेवला आहे' या वाक्यात गर्भित असलेली टीव्हीची समोरची बाजू म्हणजे टीव्हीच्या पडद्याची बाजू आहे. टीव्ही ठेवलेली जागा वाक्य उच्चारणाऱ्या माणसाच्या मागे असो अथवा पुढे, तो दक्षिणेकडे तोंड करून ठेवलेला असो अथवा पूर्वेकडे, चष्म्याची जागा त्यामुळे बदलत नाही. परंतु जर टीव्ही १८० अंशांतून फिरवला तर टीव्हीच्या पुढे असलेला चष्मा टीव्हीच्या मागच्या बाजूला होतो. अशाप्रकारच्या संदर्भचौकटीस 'अंतर्भूत संदर्भचौकट' असे म्हणतात. घर, टीव्ही, ट्रक या वस्तूंच्या

पुढची अथवा मागची बाजू ठरविण्यात काही अडचण नाही. तसेच त्याबाबत दुमत नाही. परंतु मागची व पुढची बाजू अंतर्भूत नसलेल्या टेलिफोन नंबरच्या बाबतीत मात्र आपल्याला मागची बाजू व पुढची बाजू 'ठरवावी' लागते व या ठरविण्याच्या प्रक्रियेत दुमतही असू शकते. दुसरी संदर्भचौकट ही सापेक्षसंदर्भित आहे. 'झाडाच्या डावीकडे चेंडू आहे', यासारख्या वाक्यात ज्या वस्तूचे स्थलवर्णन करायचे आहे, ती वस्तू (चेंडू), ज्या वस्तूच्या तुलनेत वर्णन केले जाणार आहे, ती वस्तू (झाड) व या दोन्ही वस्तूंपासून वेगळा असणारा वर्णनकार (माणूस) या तीन गोष्टींचा परस्परसंबंध महत्त्वाचा आहे. चेंडूला तसेच झाडालाही मागची, पुढची, उजवी, डावी अंतर्भूत बाजू नाही. झाडाची (व अवलंबून असणारी चेंडूची) उजवी अथवा डावी बाजू ही निरीक्षकाच्या स्थलावर अवलंबून आहे. निरीक्षकाची जागा जर विरुद्ध बाजूस झाली (म्हणजे १८० अंशाने बदलली) तर चेंडूच्या स्थलाचे वर्णन 'झाडाच्या उजवीकडे चेंडू आहे' असे होईल. थोडक्यात 'उजवी' अथवा 'डावी' बाजू या सापेक्ष संकल्पना आहेत. संदर्भबिंदू बदलला तर त्या बदलत जातात. म्हणून अशा संकल्पनांची व्याख्या करताना निरपेक्ष संदर्भ घेण्याची गरज असते. जपानी भाषेच्या शब्दकोशात 'उजवा' हा शब्द शोधल्यास 'सूर्याकडे तोंड करून उभे राहिल्यानंतर आपल्या दक्षिणेकडे असलेली बाजू म्हणजे उजवी बाजू होय', असे वर्णन दिले आहे. तर फ्रेंच भाषेच्या शब्दकोशात 'मानवाच्या शरीरात हृदय असलेल्या बाजूच्या विरुद्धची बाजू म्हणजे उजवी बाजू होय.', अशी व्याख्या दिली आहे. वरील चेंडूचे स्थलवर्णन करणाऱ्या वाक्यामध्ये चेंडूची जागा न बदलता निरीक्षकाची जागा बदलली, की चेंडूचे झाडाशी संदर्भित वर्णन उजवीकडून डावीकडे अथवा डावीकडून उजवीकडे बदलते, हे पाहिले; परंतु असं वर्णन करणं फक्त मेंदू साधारणपणे काम करणाऱ्या लोकांनाच शक्य आहे, हे प्रयोगाने सिद्ध झालं आहे, असं प्रा. लेव्हिन्सन यांनी आपल्या पुस्तकात नमूद केलं आहे. इटलीमधील मानसशास्त्रज्ञांनी मेंदूच्या उजव्या पुढच्या भागामध्ये दोष असलेल्या लोकांना त्यांच्या मिलान या गावातल्या एका प्रसिद्ध चर्चसमोर तुम्ही उभे आहात, असं समजून उजवीकडे काय आहे व डावीकडे काय आहे, याचं वर्णन करायला सांगितलं. मेंदूच्या उजव्या भागात दोष असल्याने हे लोक डावीकडे काय आहे, याचं अजिबात वर्णन करू शकले नाहीत. (मेंदूचा उजवा भाग डावीकडील दृष्टी नियंत्रण करतो.) परंतु त्यांनी उजवीकडील बाजूचे अत्यंत व्यवस्थित वर्णन केले. यानंतर याच लोकांना तुम्ही आता चर्चकडे पाठ करून उभे आहात असं समजून उजवीकडील व डावीकडील वर्णन करावयास सांगितले असता, त्यांनी त्या वेळी पुन्हा उजवीकडचं तंतोतंत वर्णन केलं; पण डावीकडचं वर्णन ते करू शकले नाहीत. परंतु

या वेळी त्यांनी तंतोतंत वर्णन केलेली बाजू ही पहिल्या प्रयोगात ते अजिबात वर्णन न करू शकलेली बाजू होती. अशा प्रकारच्या प्रयोगांतून मेंदूमध्ये भाषा कशा पद्धतीने 'प्रोसेस' केली जाते, हे समजू शकते. या विषयावर आजकाल जगातील भाषाशास्त्रज्ञ, मानववंशशास्त्रज्ञ, मानसशास्त्रज्ञ व वैद्यकीय तज्ज्ञ आपापल्या शास्त्रांच्या भिंती ओलांडून एकमेकांच्या सहकार्याने शोध घेत आहेत. तिसरी संदर्भचौकट ही निरपेक्ष संदर्भचौकट आहे. या संदर्भचौकटीतील संदर्भबिंदू हे पूर्व/पश्चिम/दक्षिण/उत्तर/नदीकडील बाजू/डोंगराकडील बाजू यांसारखे अचल तसेच निरपेक्ष संदर्भबिंदू आहेत. मराठी भाषेत जेव्हा आपण सदनिकेचा करार लिहितो, तेव्हा सदनिकेचे वर्णन या निरपेक्ष संदर्भचौकटीत करतो : ''याची चतु:सीमा ऐशी : पूर्वेस..., पश्चिमेस....'' परंतु दैनंदिन जीवनामध्ये घरचा पत्ता सांगताना 'सिटी पोस्टाशेजारी' अथवा 'फर्ग्युसन कॉलेजच्या पाठीमागे', असं वर्णन करतो. मराठी भाषेच्या काही बोलींमध्ये 'खालच्या अंगाचा हंडा', 'वरच्या अंगाचा हंडा' असा शब्दप्रयोग केला जातो. मराठी भाषेत पूर्व व उत्तर या दिशांचा अनुक्रमे सुरवात व शेवट, आधी व नंतर अशा अर्थाने उपयोग होतो. उदा० पूर्वार्ध-उत्तरार्ध, पूर्वपीठिका, उत्तरपूजा, उत्तराधिकारी, उत्तरोत्तर प्रगती इत्यादी. पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर या दिशाचक्राची सुरवात पूर्वेने होते व शेवट उत्तरेत होतो. परंतु हे दिशाचक्र संस्कृतीपणे बदलू शकते. जपानी भाषेत चार दिशांचे चक्र हिगाशी (पूर्व), निशी (पश्चिम), किता (उत्तर) व मिनामी (दक्षिण) असं सांगतात.

■

दै. सकाळ, ४-२-२००७

---

## परीक्षणासाठी आलेली पुस्तके

- ऱ्हस्व दीर्घ शुद्ध शब्द- प्रा. प्रभाकर पिंगळे, फुलराणी प्रकाशन, ठाणे. पृ. ९५, किं. रु. ८०/- २००६
- शब्द : अनेक अर्थ, नेमका उपयोग - प्रा. प्रभाकर पिंगळे, फुलराणी प्रकाशन, ठाणे, पृ. ७४, किं. रु. ३५/-१९९६
- सुविचारांवरून निबंध - सौ. मंदाकिनी पिंगळे, मृण्मयी ऋग्वेदी प्रकाशन, ठाणे. पृ. ८८, किं. रु. ५०/- २००४
- सुभाषितांवरून निबंध - प्रा. प्रभाकर पिंगळे, मृण्मयी ऋग्वेदी प्रकाशन, ठाणे. पृ. ८८, किं रु. ५०/- २००४

# प्रतिकाराचे सौंदर्यशास्त्र

डॉ. आनंद जोशी

आफ्रिकेतील केनियामधील काही भागांत 'गिकुयु' ही भाषा बोलली जाते. ब्रिटिशांच्या काळात शाळेत 'गिकुयु' शिकवण्यास बंदी होती. एक मुलगा ही भाषा शाळेत बोलताना दोन शिक्षकांनी ऐकले. त्यांनी 'माकडा' म्हणून त्याला छडीने फोडून काढले. पोर रक्तबंबाळ झाले. गुगी वा थिआँग त्या वेळी बारा वर्षांचा होता. त्याने हा भयानक प्रकार पाहिला. भाषेचा हा तुरुंग पाहून तो हादरलाच. त्याच वेळी त्याच्या अंतरंगात 'गिकुयु' भाषेत लिहिण्याचे कुठेतरी नक्की झाले. आज गुगी वा थिआँग हा 'गिकुयु'त लिहिणारा सुप्रसिद्ध जागतिक लेखक आहे.

केनियाला १९६३मध्ये स्वातंत्र्य मिळाले. गुगी 'गिकुयु' भाषेत लिहू लागले. प्रसिद्ध लेखक झाले. त्यांनी जोमो केन्याटा यांच्या राजवटीवर टीका करणारे नाटक लिहिले. त्यामुळे त्यांची तुरुंगात रवानगी झाली. त्यानंतर डॅनियल मोई यांची राजवट सुरू झाली. केनियामधील खडतर जीवनावर 'पेटल्स ऑफ ब्लड' ही कादंबरी त्यांनी इंग्लिशमधून लिहिली. खटला नाही, आरोप नाही, पण पुन्हा तुरुंगवास सुरू झाला. तुरुंगात त्यांनी टॉयलेट पेपरवर 'डेव्हिल ऑन द क्रॉस' ही 'गिकुयु' भाषेत कादंबरी लिहिली.. हुकूमशाहीची खिल्ली उडवणाऱ्या या कादंबरीचा इंग्लिश अनुवाद 'विझर्ड ऑफ द क्रो' प्रकाशित झाला. त्याच्यातील उतारे वॉशिंग्टन येथील हॉवर्ड विद्यापीठात वाचून दाखवताना गुगी म्हणाले, ''या 'गिकुयु' भाषेतील कादंबरीचा इंग्लिश अनुवाद लेखकानेच केला आहे. हे या कादंबरीतील सर्वांत सुंदर वाक्य आहे.'' कादंबरी लिहिण्यास व अनुवादास त्यांना दहा वर्षे लागली. 'गिकुयु' भाषेचा खेळकरपणा, लय इंग्लिशमध्ये आणणे हे आव्हान होते, ते त्यांनी पेलले.

आज जागतिकीकरणाच्या काळात नववसाहतवाद सुरू झाला आहे. आफ्रिकी देशांच्या नैसर्गिक साधनसंपत्तीच्या नियंत्रणाबरोबर स्वभाषेचे नियंत्रणही इतरांच्या हातात गेले आहे, असे गुगी यांचे म्हणणे आहे. ''स्वभाषेच्या पायावर उभे राहून आपण जगाशी संवाद साधणार आहोत. मी इंग्लिश भाषेकडे एक याचक म्हणून जाणार

नाही. मला माझी भाषा आहे. त्याच भाषेत मी लिहीन,'' असे गुगी यांनी ठासून सांगितले आहे. वसाहतवादामुळे आफ्रिकेच्या सांस्कृतिक पायाला तडे गेले. त्याच्यावर आता जागतिकीकरणाच्या दबावाचे आघात होत आहेत. हा सांस्कृतिक पाया पुन्हा उभारण्यासाठी गुगी सतत प्रयत्नशील आहेत. यालाच ते 'प्रतिकाराचे सौंदर्यशास्त्र' म्हणतात.

केनियातील स्थित्यंतराचे गुगी साक्षीदार आहेत. केन्याटांच्या मृत्यूनंतर १९७८ साली गुगी यांची तुरुंगातून सुटका झाली, पण मोई यांच्या राजवटीतसुद्धा त्यांच्या मागचा ससेमिरा संपला नव्हता. शेवटी १९८२मध्ये गुगी अमेरिकेला गेले. आज ते कॅलिफोर्निया विद्यापीठात इंग्लिश व तौलनिक साहित्याभ्यासाचे प्राध्यापक आहेत आणि 'इंटरनॅशनल सेंटर फॉर रायटिंग ॲण्ड ट्रान्सलेशन'चे संचालक आहेत.

किबाकी केनियाचे राष्ट्राध्यक्ष झाल्यानंतर २००४ साली गुगी केनियाला भेट देण्यासाठी आले. एखाद्या 'हीरो'सारखे त्यांचे स्वागत झाले. ''मी खुल्या दिलाने, सांस्कृतिक पायाला स्पर्श करण्यासाठी, शिकण्यासाठी मायदेशी आलो आहे,'' असे गुगी यांनी जमलेल्या जमावाला सांगितले. त्यांना देशभर दौरा काढायचा होता. व्याख्याने द्यायची होती, पण एका रात्री नैरोबीतील त्यांच्या घरात तीन शस्त्रधारी माणसे घुसली. त्यांनी गुगी यांना मारहाण केली. गुगींच्या बायकोवर बलात्कार केला. तिला भोसकले. दोघांनाही रुग्णालयात दाखल करावे लागले. मरता मरता दोघेही वाचले. केनिया देश हादरून गेला. सुपारी देऊन कोणीतरी हा हल्ला केला, पण अजून भक्कम पुरावा हाती आलेला नाही. कोर्टात हजर राहण्यासाठी ते व त्यांची पत्नी केनियाला येतात व परत जातात. त्यांना केनियाला परत यावयाचे आहे, पण सध्यातरी ते अमेरिकेत राहणे पसंत करतात. 'मला हुतात्मा होण्याची इच्छा नाही,' असे गुगी म्हणतात.

गुगी यांनी मातृभाषेत लिखाण केले, पण ते जगभर पोहोचण्यासाठी त्यांना इंग्लिशचा आधार घ्यावा लागला. मायबोलीवर प्रेम करून तिला जगप्रसिद्ध करायचे असेल तर जगात जी प्रचलित जनभाषा - आज इंग्लिश आहे त्या भाषेत शिक्षण घेऊन, तीवर प्रभुत्व मिळवून मायबोलीतून साहित्य अनुवादित केल्याशिवाय गत्यंतर नाही. मायबोली वाचवण्यासाठी प्रतिकाराचे सौंदर्यशास्त्र वापरणे हा सुसंस्कृत मार्ग आहे.

■

दै. लोकसत्ता, ४-२-२००७

# शब्दानुबंध

सुमन बेलवलकर

[परीक्षित पुस्तक : शब्दानुबंध, शंकर सखाराम, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई ४, २००५, पृष्ठसंख्या १४३, किं. १२५ रु.]

'शब्दानुबंध' हे पुस्तक शीर्षकावरून संस्कृतप्रचुर वाटले तरी ते तसे नाही. हा लेखक मराठी साहित्याचा अध्यापक, अभ्यासक आहे आणि भाषेचा चौकस, डोळस निरीक्षक आहे. उत्तर कोकणातल्या दरिद्री कुटुंबातील बालपणापासूनच त्याच्या कानावर बोलभाषेतल्या असंख्य म्हणी, उखाणे, वाक्प्रचार आणि परिसरातली गाणी लयतालासह पडत होती. कुटुंबीय, सवंगडी आणि गावकरी यांच्या सहवासामुळे त्याने जे जे ग्रहण केले त्याला सामाजिकतेचे अस्तर होते. लेखकाने परिसरातली बोली आणि मराठी साहित्यातील ज्ञानेश्वरीपासून बोरकरांच्या कवितेपर्यंत अनेक शब्दांचा आपल्या पद्धतीने मेळ घातला आहे. ज्ञानेश्वरीतल्या लांबा, अंबवणी, वल्हाटसारख्या शब्दांचे अर्थ कोशांनी मोघम, अपुरे दिले आहेत. परंतु लेखकाला आपल्या अनुभवांत त्यांचे समर्पक अनुबंध सापडत गेले. ते मांडण्याच्या प्रयत्नातून 'ललित' मासिकात एक सदर शंकर सखाराम यांनी लिहिले. भाषेच्या अभ्यासकांना त्यातली अपूर्वता आणि मौलिकताा पटली आणि या सदराला ग्रंथरूप मिळाले.

ज्ञानेश्वरीतील 'लांबा उगवे आगरीं । विभवश्रियेचां' (६.४४४) विषयीचा लेख शंकर सखारामांनी सर्वात आधी लिहिला होता. लांबा म्हणजे कोंब, भाताचे रोप असे वेगवेगळे अर्थ कोशांनी अंदाजाने दिले होते. लेखकाला आगरात उगवणारा गरिबांचा पहिल्या भुकेचा साधा लांबा आणि कुशालांबा या सर्व प्रकारांची माहिती होती. त्यांनी दिलेल्या खुलाशामुळे ज्ञानेश्वरीतील त्या ओवीचे प्रमेय अचूक सुटले. इथे प्रश्न पडतो तो असा की, उत्तर कोकणातल्या भातशेतीतला 'लांबा' देशावरच्या ज्ञानेश्वरांनी, तोही ज्ञानेश्वरीसारख्या प्रौढ ग्रंथात, कसा वापरला ? याचे उत्तर असे की, ज्ञानेश्वरी असो की लीळाचरित्र; मराठीतले हे पहिले ग्रंथ सामान्य माणसांसाठीच लिहिले गेले होते. त्यामुळे त्यांत बोलभाषेतील शब्दांची मुक्त पखरण आहे.





अनुक्रमणिका

लीळाचरित्रातील सलदी, पोपटी, हरिवरदेतला चेंडूफळी हे शब्द आजही लोकजीवनात, लोकभाषेत, टिकून आहेत असा लेखकाचा अनुभव आहे. देशी तोंडवळ्याच्या अशा शब्दांचा अर्थ अभिजनांच्या संस्कृतीपेक्षा शेतीनिष्ठ अशा ग्रामीण संस्कृतीत शोधण्याचा मार्ग शंकर सखारामांनी या पुस्तकात दाखवला आहे. त्यांच्या नजरेने, रामजोशींच्या संस्कृतीकरण केलेल्या 'कुलविद्याजडावटिकली'चा भ्रम उलगडून दाखवला आहे. (१०८)

'कुलविरुद्याजडाव टिकलि, मनामधि टिकलि, नाहि हटकली, तेज अनिवार'

अशी त्या ओळीची संगती लेखकाने लावली आहे. केसातले सोन्याचे फूल, पायाच्या बोटांतल्या बिरुद्या, जडावाचे दागिने आणि कपाळावर झळकणारी कुंकवाची टिकली या सर्वांचे 'नखशिखान्त' (इथे मात्र डोक्यापासून पायापर्यंत) चमकणारे तेज हेच खरे 'अनिवार' ! तिला हटकण्याची हिंमत झाली नाही, ती फक्त मनात टिकली (ठसली) हा तो अर्थ ! त्याचा कुल आणि विद्या यांच्याशी सुतराम संबंध नाही.

अक्षीच्या पहिल्या मराठी कोरीव लेखावरचा लेखही अतिशय ललितरम्य आहे. राजाचे केसीदेवराय हे नाव, सेणुई म्हणजे शेणवी (सारस्वत) महाप्रधानाचे भइर्जु (बहिरजी) आणि लुनया हे कचलीचे म्हणजे कोरणाऱ्याचे नाव ही विशेषनामे त्या काळातील सामाजिक स्तरांनुसार आहेत ही लक्षात घेण्याजोगी बाब आहे.

लेखकाने मध्ययुगीन साहित्यातील ज्ञानेश्वरीतून विपुल संदर्भ दिले आहेत. याशिवाय बोरकरांच्या 'जळात ज्योती' या कवितेवर लिहिलेल्या सरग्रहणात्मक लेखातून आाधुनिक साहित्यातले मर्महीं उकलून दाखवले आहे. 'नवकाव्य' हा शब्द ग. रा. कामतांनी दिला (पृ ७२) ही नोंदही लेखक 'शब्दवेधी' असल्याची साक्ष देते.

या पुस्तकातील काही लेखांत येणारी लोकगीते सामाजिक दमनाचा, चातुर्वर्ण्य-मनुस्मृतीच्या दडपशाहीचा विचार प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे मांडतात. भाषा समाजाची म्हणून समाजातले वर्गकलह, दुबळ्यांचे शोषण आणि फसवणूक त्याच भाषेत प्रकट होते.

राम वाचीत व्हता पोथी । सीता सांगीत व्हती अर्थ ।
अर्थ सांगता सांगता । राम कुर्धाशी हो आला (७)

मुकाट्याने ऐकण्याऐवजी सीतेने पोथीचा अर्थ सांगण्याचा 'अगाऊपणा' करावा याचा रामाला राग आला. तिने लक्ष्मण रेषा ओलांडली तेव्हा निदान रामाचा तरी क्रोध तिच्या वाट्याला आला नव्हता.

गावंढ्या गावातून चंपावती-चौलसारख्या शहरात आलेल्या मुलाच्या वाट्याला आलेले दमन (रॅगिंग) ''नांगटा बांबोरा/चाऊल कोंबोरा (भात बोकण्या/ कोंबणारा) चौला गेला/चऊलचे पोराही ढकलून दिला'' (२०) या लोकगीतातून व्यक्त होते.

भाबड्या सरळपणाने ठेवलेल्या विश्वासाचा घात झाला आणि लबाडांनी आपला हेतू साधला हे समाजचित्र इथे प्राणीपाखरांच्या गाण्यांतून व्यक्त होते. जंगलातल्या कुत्र्यांना कोल्ह्यांनी गावात येऊ दिले आणि कुत्र्यांनी गाव काबीज केले. मग-

उन्हान पाऊस परतय, परतय/कोल्ह्याची आइस लरतय, लरतय (९५)

अशी पस्तावण्याची वेळ आली. कोल्ह्यांच्या संघटित आक्रोशाचीही 'कोल्हेकुई' म्हणून संभावना झाली. देखण्या साळुंकीने आपले कुरूप पाय लग्नापुरते मोराकडे बदलून मागितले आणि नंतर ती ते परत द्यायचे विसरून गेली. पूर्वी सर्वांगी सुंदर असलेला मोर,-

मोर रं मोर/त्याला सर्वांगी डोलं/पायाकरं बघून/मोर खलखला लरं (११५)

या 'खलखला लरं' शब्दांमुळे त्याच्या आसवांपुढे खरा पाऊसही फिका वाटतो. माणसांच्या समाजात,- वामुन झाला राजा गो/लोनी त्याचे हात्ये गो
तुम्हा आम्हा ताक गो/तूप त्याचे भात्ये गो (१०२)

हे गाणे वामनाच्या रवीने ताक घुसळणाऱ्या कुणाबिणीच्या ओठावर येते. श्रेष्ठश्रीमंताच्या बालगीतातही,-

अडगुलं मडगुलं/सोन्याचं कडगुलं, मखमली पायात/रुपेरी वाळा (७२)

असतो. गरीब कुणबी मुलांची गाणी ''यरं कोल्ह्या यरं कोल्ह्या भाटांशी/चिंभोरा हान रं खारटांशी/पेंदं पेंदं अमकंला/शिंगऱ्या नांगऱ्या तमकंला'' (७३) या तऱ्हेची ! चिंबोऱ्या पकडणं हा या मुलांचा खेळ, खाऊचं साधन म्हणून गाणंही तेच ! भाषा आणि समाज यांचे परस्पर नाते असते ते असे !

जातिव्यवस्थेतील पारडी वरखाली होणे समाजात प्रत्यक्षात अशक्य असते. मग उच्च वर्णाविषयीचा विद्रोह,- भटमामा भटमामा शेंडी ताठ (८९)
बामनानी मासा खाल्ला रे (९०)

अशा विनोदी भाषिक चिमट्यांमधून व्यक्त होतो. विशेषतः बामनाला मासा खाताना बलुतेदारांची कशी मदत झाली हे सांगून त्यांचे महत्त्व दाखवून दिले जाते. या पुस्तकातील 'शब्दानुबंध' या शीर्षकाच्या लेखात उल्लेखलेल्या आगरी, आदिवासी जीवनातील गीतांविषयी वाचताना नागरी वाचकांची अभिरुची निश्चित डोळस होईल. सांचे पाऽऽ राऽ / बसून मंगले दाऽऽ राऽ
बाय नको लरू / दिलीय म्होटे घऽऽ राऽ (१५)

असा आरंभ असलेलं लगीनगीत पांढरपेशा मुंबईकर बसमध्ये ऐकतात. भोळ्या आयबापानी धरलेल्या लग्नाचे वर्णन तितकेच साधेसरळ ! पुढे,-

लगीन करून न्हवरा आला







धरला पदर त्यांनी

बायचा, पलंगाव ऽऽ री. (१६)

हे शब्द कानावर पडताच सगळे सोवळे स्त्रीपुरुष गहजब करतात. बिचारा गाणारा बेदम मार खातो. बायच्या आयुष्यातील संसारदुःखांना सोसण्याची समजूत घालणारे गाणे एका रात्रीच्या शृंगारासाठी अश्लील ठरते. दुसऱ्या एका गीतात-

चांदुने राती बायनी / अंगना सारवीला

अंगन्यात भरले / मोत्याचे चउकरे (२)

असा चांदण्याच्या साक्षीने होणारा बाय नि बालाचा ग्रामीण 'मधुचंद्र' नितांत सुंदर आहे. ''वाटेवरचे केसरे (खेचरे) गो / बामाय जाते सासरे'' (४९) ही तिची पाठवणी अशीच लाडाकोडाची ! सासरी जाताना तिला कितीतरी दागदागिने, नव्यानव्या साड्या दिल्या जातात. प्रत्यक्षात ज्यांच्या हातात सोनंनाणं नाही, त्यांची हौस गाण्यातल्या शब्दांनी अशी पुरी होते.

लोकजीवनावर आधुनिकतेचे आक्रमण दाखवणारा एक पोवाडा इथे आहे. जपानी तायचुंग भाताचा रान उठवणारा प्रचार सरकार करत असताना-

असा यक तो कुनबी / घरचा सुखी / लावली जपानी ऽऽ/ यके बिघंला भात पिकवला / सारेतीन खंडीऽऽ (२५)

असे वरून गोडवे गायले जातात. पण पुढील अनर्थाची सूचना -

माचीचे रानात / पिंगला कचाचत

अशी मनात करकरत जाते. पांढरपेशांची 'दिन दिन दिवाळी' इथे 'धन दन दिवाळी' (८१) असते. शाहिरांच्या रंगांच्या लावण्यांपेक्षाही सरस अशी

भरभर मुठी उडं गुलाल / शिमगा खेलं मदन गोपाल

या या गुल्लालाचा भार / गड्यांच्या पगड्या झाल्या लाल (११४)

ही शिमग्याची गाणी टिपऱ्यांच्या 'घाय' बरोबर गाइली जातात. एकूणच पोशाखीपण, जिभेचे चोचले आणि सात पिढ्यांची तरतूद यांच्यामागे लागलेला अभिजनांचा समाज एकीकडे आणि दिवसा डोळ्यांसाठी अखंड हिरवेपणा, रात्री अंगणभर चांदणं आणि जोडीला उखाण्या-ठकाण्या-गाणी असं जगणारे हे आगरी दुसरीकडे असा विरोधाभास हे पुस्तक वाचताना सतत समोर येत राहतो.

या पुस्तकाचा खरा गाभा आहे तो आदिमवासीयांच्या शब्दवैभवाचा ! समाजवस्तीबाहेरच्या खलाटी-वलाटीच्या आगरांमधल्या भाषेने किती ताजं पाणी मराठीच्या मुख्य प्रवाहात सोडलं आहे, याची कल्पना हे पुस्तक वाचल्यानंतर येते. या लेखनाची मौलिकता शब्दानुबंधाच्या अशा अनेक उदाहरणांमधून अनुभवता येते.





अनुक्रमणिका

'कावला तपेली वाजवतंय' मधल्या तपेलीचे हंडोली, पपोरी, पिपेरी, पिंकाणी, पिपाणी हे पाठभेद आणि पिपीऽऽ वाजणारी ती पिपी, ती मूळ पानाची बनविलेली म्हणून 'पिपीपानी' (१०) ही अर्थनिश्चिती लेखकाची व्यासंगी बुद्धी दाखवून देते. 'लावन्याभवन्या'चे 'लवन्यागोवन्या' हे शुद्धीकरण (३४), आवटणी (४१) ऋषिपंचमी (कुरुसीपंचमी, कृषि / कास्तकारांची), अकामका (१२२) टिवल्याबावल्या (दिवाळीच्या पणत्या, बाहुल्या १३७), आगीनगारी (बगीनगारी) (१०९), दुसऱ्याच्या दुःखानं सुखी होणारी ह्यवदुखी (५६) व्हल्लाट (होल लॉट) (१३९) असे किती शब्दानुबंध ! हा भाग यापूर्वीच्या कोणत्याही भाषाविषयक लेखनात आलेला नाही. कारण हे अनुबंध त्या प्रादेशिक जीवनातले आहेत. लेखकाच्या मनात मुरलेल्या स्वभाषेतल्या, बोलीतल्या शब्दांचा शोध उखाण्याकहाण्यांमधून घेऊन त्याने ते अनुबंध उलगडून दाखवले आहेत. केवळ रुक्ष व्युत्पत्ती न मांडता रंजकपणे कथन केले आहेत.

लेखकाची शैली लेखनापेक्षा कथनाला अनुकूल असल्यामुळे त्याच्या भाषेतही अनेक ठिकाणी समर्पक, वेगळे वाटणारे शब्दप्रयोग आढळतात. वसंत जून होणे, पाऊस म्हातारा होणे, गंधभरले वारे, नदीवरच्या पाणेरणी, खताने बाटली जमीन, उखळण-चिखळण, मांसाळलेली हिरवीगार माळराने, हिवाळी सुट्टी ती दिवाळी सुट्टी, चान्नान चान्ना पीठभर चान्ना, शेंगांचा उकडवास, शिमग्याचे सहखाणे, बाईच्या जडभाराला उतार असे अनेक शब्दप्रयोग या लेखकाच्या भाषेच्या अस्सलपणाची साक्ष देतात. 'शब्दानुबंध' स्वभाषेत शोधणाऱ्या या लेखकाला 'गाताना गायक आणि श्रोते यांचा शब्दानुबंध जुळला नाही,' किंवा 'गद्धेगाळ असलेल्या पहिल्या मराठी शिलालेखाचा स्थानिकांशी शब्दानुबंध जुळला नाही,' याची मनापासून खंत वाटते.

या लेखनाचे स्वरूपच असे आहे की, ते एखाद्याला विस्कळीत वाटावे. पण कणाकणाने गोळा केलेले हे शब्दानुभव त्यातल्या विविधतेसह मोलाचे आहेत; भाषेला समृद्धी आणणारे आहेत. या लेखांना लेखकाच्या जगण्याचा जसा आधार आहे तसाच बत्तीस कोशांच्या आणि पूरक ग्रंथांच्या व्यासंगाचा आहे.

राजसूय यज्ञ करणाऱ्या साहित्यिक युधिष्ठिरांनी थोडे लक्ष देऊन पाहिले तर या अभिनिवेशरहित लेखनातला नकुल आधीच अर्धा सुवर्णाचा आहे, हे त्यांच्या लक्षात येईल. ■

*(या पुस्तकाला मराठी अभ्यास परिषदेचा २००६चा 'महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार' मिळाला आहे.)*

पश्चिम विभागीय भाषा केंद्र, डेक्कन कॉलेज, पुणे 411006

# भाषाशिक्षणातील मर्मदृष्टी

नीलिमा गुंडी

[परीक्षित पुस्तक : 'मुलांची भाषा आणि शिक्षक' लेखक कृष्णकुमार. मराठी रूपांतर : वर्षा सहस्रबुद्धे. मूलगामी प्रकाशन, पुणे, पृष्ठे : ८४ किंमत रु. ८०/-]

इतर भाषांमधील पुस्तके मराठीत वेगवेगळ्या कारणांमुळे अनुवादित होत असतात. पण जेव्हा मराठीतील नेमक्या उणिवा हेरून नव्या विचार-संकल्पनांची आयात अनुवादातून होते, तेव्हा त्या कृतींचे खास स्वागत करायला पाहिजे. कृष्णकुमार यांच्या 'दि चाइल्ड्स लँग्वेज अँड दि टीचर' या पुस्तकाच्या रूपांतराने मराठीतील एक उणीव दूर झाली आहे.

कृष्णकुमार हे दिल्ली विद्यापीठाच्या शिक्षणविभागात 'प्रोफेसर' असून 'सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशन'चे ते प्रमुख आहेत. रूपांतरकर्त्या वर्षा सहस्रबुद्धे या काही काळ 'अक्षरनंदन' (पुणे) शाळेच्या मुख्याध्यापिका होत्या. त्यांनी 'पालकनीती' या मासिकातून हे रूपांतर प्रथम प्रकाशित केले. लहान मुले, भाषा आणि शिक्षणव्यवहार या तीन बिंदूंचा वेगवेगळ्या नात्यांनी विचार करणारे आणि विचार करायला उद्युक्त करणारे असे हे लेखन आहे. पुस्तकात पाच प्रकरणे असून (१) भाषा म्हणजे काय ? (२) बोलणे (३) वाचणे (४) लिहिणे व (५) पाठ्यपुस्तके, परीक्षा आणि अवकाश, असा त्यांचा क्रम आहे.

मुलांच्या विकासात भाषाशिक्षणाचे स्थान महत्त्वाचे असते; हे सूत्र समोर ठेवूनच पुस्तकाची मांडणी केलेली आहे. ''भाषा हे संवादाचे साधन आहे, अशी व्याख्या करणे आपल्यापैकी बहुतेकांच्या इतके अंगवळणी पडले आहे, की विचार करणे, संवेदना किंवा जाणीव होणे आणि प्रतिसाद देणे या सर्वांचे साधन म्हणूनही भाषा फार उपयोगाची आहे, हे आपण अनेकदा विसरतो.'' (पृ. २) असे म्हणून पहिल्या प्रकरणात मुलांची दृष्टी, क्षमता, वृत्ती, आवडी आणि मूल्ये यांच्यासह मुलांचे व्यक्तिमत्त्व भाषेतून कसे घडते, याविषयी साध्या-सोप्या उदाहरणांतून विवेचन करण्यात आले आहे. अनुभव घेऊन झाल्यानंतर पुन्हा त्याच्यापर्यंत पोहोचायची वाट शब्द

निर्माण करीत असतात, त्यामुळे कृती आणि वस्तू यांच्याशी संबंध जोडले गेलेले शब्द अनुभवण्यासाठी मुलांना घरी व शाळेत मुक्त वातावरण मिळण्याची गरज लेखक प्रतिपादन करतात. त्यासाठी बडबडगाणी आणि कथांचा वापर करताना कोणती पथ्ये पाळायची हे ते सांगतात.

शिकलेल्या गोष्टी स्थिर, पक्क्या होण्यासाठी 'बोलणे' आवश्यक असते. कृष्णकुमारांच्या मते पूर्वप्राथमिक आणि प्राथमिक शाळांमध्ये मुलांना बोलण्याची संधी भरपूर प्रमाणात मिळायला हवी. (आपल्याकडे मात्र 'तोंडाला कुलूप' लावायला सांगितले जाते !) लक्षपूर्वक ऐकणे, या कौशल्याकडे आपण कमी लक्ष देतो. खरे तर बौद्धिक विकासासाठी या कौशल्याचीही विशेष जोपासना करायला हवी.

मुलांचे व्यक्तिगत जीवन त्यांनी आपल्या भाषेतून व्यक्त करणे आणि शिक्षकांनी रस घेऊन ते ऐकणे, हाही आपल्या शालेय चौकटीत शिष्टसंमत नसलेला अनुभव होय. अशा अनुभवांतूनच मुले आणि अभ्यासक्रम यांची फारकत लेखक टाळू इच्छितात. गोष्ट, अभिनय इत्यादी पारंपारिक मार्गांचा अधिक सजगतेने वापर (उदा० गोष्टीनंतर तात्पर्य न काढणे इ.) करण्यावर ते भर देतात.

मुलांना 'वाचते' करण्यातील रोमांचकता सांगताना लेखकाने वाचनाची केलेली व्याख्याही लक्षात घ्यायला हवी. ते लिहितात : 'वाचन म्हणजे लिहिलेल्या शब्दांमधील अर्थ गवसण्याची प्रक्रिया.' वाचताना भाषेच्या घडणीशी निगडित विविध सूचकांवर एकाचवेळी प्रक्रिया करावी लागते. लेखकाच्या मते बाराखडीचिन्हे असलेले शब्द मुलांच्या वाचनात सुरुवातीपासूनच असायला हवेत. मुलांची नजर सरावणे, त्यांना वाचते ठेवणे यासाठी यात अनेक मनोरंजक खेळ सुचवले आहेत.

'लिहिणे' या कृतीतील 'शिक्षकांसाठी कृत्रिमपणे लिहिणे' हा भाव दूर सारून 'कुणीतरी ऐकत असते म्हणून लिहिणे' ही भावना रुजवायला हवी. मुलांच्या लेखनाबाबत शिक्षकांचा प्रतिसाद प्रोत्साहक हवा; लाल शेरे मारून त्यांना गप्प करणारा नको, हे लेखक आवर्जून सांगतात.

शिक्षकाला शालेय जीवनात पाठ्यपुस्तकातील क्रमिक धड्यांचा 'बौद्धिक लगदा' मुलांना भरवावा लागतो, याविषयीची खंत व नाराजी शेवटच्या प्रकरणात व्यक्त झाली आहे. केवळ पाठ्यपुस्तकावर विसंबून न राहता विविध प्रसंग निर्माण करून, अनुभवाद्वारे शिकण्याची संधी त्यांना द्यायला हवी; याकडे लेखकाने लक्ष वेधले आहे.

रूपांतर करताना वर्षा सहस्रबुद्धे यांनी एका प्रकरणात काही चांगल्या मराठी बालकविता समाविष्ट केल्या आहेत. एक शिक्षिका आणि संवेदनशील आई या भूमिकांतून हे रूपांतर केले असल्यामुळे पुस्तकातील सुप्त आशयही वाचकांच्या मनात

ठसतो. माधुरी पुरंदरे यांची चित्रेही आशयाला पूरक आहेत. काही ठिकाणी गुंतागुंतीची वाक्यरचना जाणून घेण्यासाठी उपयुक्त अशी विरामचिन्हे विवेचनात द्यायला हवी होती. तसेच कागदी होडी 'बनवणे', वस्तू 'बनवणे' (पृ.३३) अशा ठिकाणी मराठी वळणाची क्रियापदे योग्य ठरली असती.

कृष्णकुमारांची लेखनशैली काहीशी सूत्रबद्ध आहे. त्यामुळे 'रूपांतर' हा पर्याय त्यांच्या लेखनासाठी अपुरा वाटतो. आपल्याकडे अनुवाद, रूपांतर यासाठी 'भाष्यलेखना'ची जी प्राचीन परंपरा आहे, ती अशा पुस्तकासाठी वापरायला हवी. कृष्णकुमार जेव्हा 'एखाद्या भाषे'विषयी काही सांगतात, तेव्हा ते मराठीच्या प्रकृतीशी कसे आणि किती जोडता येईल, याचा स्वतंत्र विचार करून त्या अनुषंगाने उदाहरणे देणे उपयुक्त ठरले असते. कृष्णकुमारांचे केवळ विचार मराठीत येणे पुरेसे नाही, तर त्यांनी जागे केलेले भाषाविषयक भान वापरून बालशिक्षणात मराठीला नवसंजीवन कसे देता येईल, याचा विचार व्हायला हवा. ■

३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, पुणे 411 002.
दूरध्वनी : 24486015 / neelimagundi@yahoo.com

## बासन

लाकडं फोडून घ्यायची होती. म्हणून गणाजी काकांकडे गेलो. तर ते म्हणाले, 'नाई न जी ! बासन शेवटून आनाव लागते.' असं म्हणून त्यांनी मला धार गेलेली कुऱ्हाड दाखविली. 'शेवटणे' म्हणजे धार लावणे. आमची संतविजय पोथी गोपाळाकाका माळी यांच्याकडे होती. माळी समाज निष्ठावन्त वारकरी. म्हणून त्या समाजातल्या सगळ्यांना साधुबुवा म्हणतात. म्हटलं, 'साधुबवा ! पोथी लागत होती.' तर ते म्हणाले, 'दम ! बासनात बाधून देतो.' असे म्हणून त्यांनी नवे कोरे रेशमी वस्त्र हाती घेतले. मुलीच्या लग्नाची पत्रिका घेऊन आलेले कमळाजी नाना सांगत होते, 'बरं का वहिनीमाय ! पोरीच्या अंगावर चांगले दहा तोळ्याचे बासनं घातले.' माझे लग्न झाल्यावर मी गावी गेलो. माझे मानलेले भाऊ मंगलदादा जैन. त्यांच्या पाया पडलो. माझ्या पत्नीकडे मायामाखल्या दिठीनं पहात ते म्हणाले, 'बासन चांगलं भेटलं जी तुम्हाले.'

— डॉ. ब्रह्मानंद देशपांडे, औरंगाबाद

# सांस्कृतिक इतिहासाची प्राथमिक सामग्री

आशा मुंडले

[परीक्षित पुस्तक : मराठी मौखिक वाङ्मय, संपादक : रामदास आतकर, राजाराम झगडे, ॲन फेल्डहाऊस. श्रीविद्या प्रकाशन, पुणे. २००६, मोठा आकार. पृष्ठे ३२९, किंमत ५००/- रुपये]

'मराठी मौखिक वाङ्मय' या भारदस्त शीर्षकाचे हे पुस्तक. प्रा. सॉन्थायमर हे जर्मनीतील हायडेलबर्ग विद्यापीठाशी संलग्न असलेले संशोधक. मराठी भाषा उत्तम जाणणारे. या पुस्तकात सॉन्थायमर यांनी स्वतः प्रवास करून परिश्रमपूर्वक जमवलेल्या धनगरी ओव्या आणि कथा (गद्य आणि पद्य) यांचे संकलन आहे. अर्थात् त्यांच्या विस्तृत अप्रकाशित संग्रहापैकी अगदी थोडा भाग या पुस्तकात आहे.

१९६६ ते १९९२ या काळातल्या ध्वनिफितींतून ही निवड केली आहे. प्राध्यापक गुन्थर सॉन्थायमर यांच्या अकाली निधनानंतर त्यांच्या तीन चाहत्यांनी हा ग्रंथ सिद्ध केला आहे. त्यांना सखाराम लकडे यांनीही साहाय्य केल्याचा उल्लेख प्रस्तावनेत आहे. यापैकी ॲन फेल्डहाऊस अमेरिकन अभ्यासक असून उरलेले तिघे भारतीय आहेत.

विरोबा, कामाबाई, पदुबाई, भागुलेक धुळोबा, भिवाई, शिंग्रुबा यांच्या ह्या गोष्टी परंपरेने चालत आलेल्या आहेत. कामधाम संपवून निवांत बसल्यावर आणि सण, उत्सव यांच्या निमित्ताने एकत्र जमल्यावर आजही या गोष्टी, ही कवने वडील पिढीकडून तरुण पिढीकडे सोपवली जातात. नव्या काळाला अनुसरून आकाशवाणीवरच्या लोकजागर कार्यक्रमातही यातल्या कथा, ओव्या ऐकायला मिळतात. दूरदर्शनवरही लोकसंस्कृती क्वचित दाखवली जाते.

महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनात धनगर या भटक्या जमातीचे एक आगळे महत्त्वपूर्ण स्थान आहे. हे व्यवसायाने मेंढपाळ असून महाराष्ट्र आणि कर्नाटक येथील ठरावीक भागात त्यांचा संचार असतो. ऋतुप्रमाणे त्यांची ठरलेल्या मार्गांवरून भ्रमन्ती असते. वाटेतील शेतकऱ्यांना मेंढ्यांचे मलमूत्र खत म्हणून पुरवणे, मांसासाठी मेंढ्यांची विक्री आणि लोकर कातून घोंगड्या, कांबळी विणणे आणि विकणे ही यांची आर्थिक

व्यवस्था. जेजुरीचा खंडोबा हे मुख्य दैवत. इंदूरचे प्रसिद्ध होळकर हे राजघराणे यांच्यापैकीच.

लोकवाङ्मय आणि त्यातून होणारे समाजदर्शन याचा अभ्यास अनेक अंगांनी करता येतो. बोलीभाषेसाठी, आशयासाठी, समाजशास्त्रीय, ऐतिहासिक, धार्मिक इत्यादी इत्यादी. अशा सर्वांसाठी हा संग्रह म्हणजे महत्त्वाची पण, प्राथमिक स्वरूपाची साधनसामग्री आहे असे म्हणता येईल. कारण यात परिश्रमपूर्वक केलेले नुसते संकलन आहे. त्याचा उगमस्रोत सांगितला असल्यामुळे याला अस्सलपण (ऑथेंटिसिटी) आहे.

क्षेत्रीय निरीक्षण (फील्डवर्क) केल्यानंतर पुष्कळदा एकदम प्रबंधच छापला जातो. पण त्याच विषयावर अधिक संशोधन करणाऱ्या नंतरच्या अभ्यासकांना मूळ डेटा उपलब्ध नसतो. ही उणीव अशासारख्या पुस्तकांनी भरून निघते. डेटा जमवण्याची आणि नोंद करून ठेवण्याची यातली पद्धती लक्षणीय आहे. तिचा प्रस्तावनेत सविस्तर खुलासा आहे. विद्यापीठीय पातळीवरील संशोधकांनी हे पुस्तक अवश्य वाचावे. सर्वच सामाजिक शास्त्रांच्या संशोधक विद्यार्थ्यांना यातून उपयुक्त शिस्तीचा वस्तुपाठ मिळेल. नोंद, मांडणी आणि अस्सल डेटा या बाबतीत आदर्श मिळेल.

संपादन, संकलन आणि मुद्रण यातील निर्दोषता अनुकरणीय आहे. तळटीपा योग्य तेवढ्याच आणि उपयुक्त आहेत. श्रीविद्या प्रकाशनाने अतिशय सुबक पुस्तकनिर्मिती केली आहे. मुखपृष्ठ आकर्षक आहे. किंमत जास्त आहे, पण आजकाल मराठीत ती असतेच.

आता या पुस्तकाच्या काही मर्यादा पाहू. पहिली म्हणजे शीर्षक. ते अतिव्याप्त आहे. 'काही धनगरी ओव्या आणि कथा' असे सुटसुटीत सोपे नाव अन्वर्थक ठरले असते. भारदस्त शीर्षकामुळे यात मौखिक वाङ्मयाबद्दल काही सैद्धांतिक विवेचन असेल अशी दिशाभूल होते. पण हे आहे नुसते संकलन. विवेचन, विश्लेषण, भाष्य नाही. मौखिक वाङ्मय हा ऐतिहासिक ठेवा आहे. म्हणून नुसते संकलनावर थांबणे बरे वाटत नाही.

निदान धनगर जमातीची काही आनुषंगिक माहिती तरी द्यायला हवी होती. महाराष्ट्रातील या जमातीची संख्या, त्यांची पारंपरिक वसतिस्थाने यांचा उल्लेख आवश्यक होता. त्याचप्रमाणे त्यांच्या ऋतुचक्राप्रमाणे होणाऱ्या भटकंतीच्या पारंपरिक मार्गांचा नकाशा अत्यावश्यक होता. वाचणारा धनगर असेलच असे नाही. म्हणून अशा संकलनाबरोबर काही प्राथमिक माहिती हवी. नाहीतर उपयुक्तता कमी होते.

परंतु याहूनही खटकलेली गोष्ट म्हणजे संपादकांनी वापरलेली सेन्सॉरशिप. मुळातील शिव्या आणि जातीवाचक शेरे वगळून त्या जागी फुल्या छापल्या आहेत

आणि हा नाइलाज आहे अशी त्याची भलावण केली आहे; परंतु हे उल्लेख संशोधन व अभ्यास यांना उपयुक्त असतात. मूळ संहितेत फुल्या छापून नंतर स्वतंत्र परिशिष्टात शिव्यांची यादी आणि कोणत्या जातींचे उल्लेख (स्तुतीपर किंवा निंदापर) आहेत त्यांची स्वतंत्र यादी अशा दोन याद्या छापणे गरजेचे होते. म्हणजे कोणाला न दुखवता प्रायमरी डेटा नंतरच्या अभ्यासकांना मिळाला असता. कारण जातीसंस्थेमध्ये इतर जातीविषयींच्या आणि स्वजातीबद्दलच्या पारंपरिक प्रतिमा सामाजिक जाणिवांचे आणि तणावांचे दर्शन घडवतात. हीच गोष्ट स्त्रियांबद्दलच्या अनुदार शेरेबाजीची.

फुल्या छापून वस्तुस्थिती लपवली तर ती स्थिती सुधारण्याचा मार्गही खुंटतो. ज्याप्रमाणे शब्दकोशातून आज वापरात नसलेले पण पूर्वी सर्रास वापरले जाणारे शब्द काढून टाकणे गैर होईल (कारण मग जुन्या वाङ्मयाचा अर्थ समजण्यात अडचणी येतील), त्याचप्रमाणे मौखिक किंवा लिखित वाङ्मयाचे संपादन, संकलन करताना मूळ संहिता बदलण्याचे स्वातंत्र्य संपादकाला नसते. कारण दस्तऐवजाचा ऐतिहासिक संदर्भ आणि त्याचे मूल्य बिनचूक पाहिजे. तरच पुढील संशोधकांना सत्यशोधनाचा मार्ग खुला राहतो. शिवाय पूर्वजांना आपण कोण दुरुस्त करणार ?

मराठीतील काही आक्षेपार्ह शब्दांची उदाहरणे पुढे देते, 'बोडकी', 'लांडा', 'भटुरडा', 'अक्करमाशा' वगैरे. आपण स्वतः मात्र बोलताना आणि लिहिताना सदभिरुची सांभाळावी, पण पूर्वजांचे 'मॉरल पोलिसिंग' करू नये. याबाबत महाराष्ट्र शासनाने प्रसिद्ध केलेल्या महात्मा फुले वाङ्मयाकडे पाहणे मनोरंजक ठरेल. तिथे कधी फुल्या आहेत, तर कधी आक्षेपार्ह मजकूर तसाच छापला आहे. संशोधक व अभ्यासक आणि साक्षेपी वाचक यांनी एकत्र येऊन यावर निश्चित धोरण ठरवले पाहिजे.

आता यातील आशयाकडे वळूया. थोडेसे माझे विचार मांडते. पुरुषसंपर्काशिवाय अपत्य व्हावे ही आकांक्षा, पराक्रम आणि चमत्कार यांचे मिश्रण, संपत्ती, खाणेपिणे यांच्या वर्णनातून जाणवणारा स्थळ, काळ यांचा संदर्भ, रहाणीमानाचे ऐतिहासिक परिप्रेक्ष्य अशा अनेक घटकांची सर्वच लोकवाङमयातून ओळख होते.

संशयावरून स्त्रीला चारित्र्यहीन ठरवून तिची कठोर परीक्षा, त्यासाठी दिव्य हे तर भारतीय स्त्रियांच्या पाचवीलाच पूजलेले. अजूनही तेच आहे. हा प्रकार बहुतेक सर्व जातीजमातींत आहे याची विषण्णता वाटते. परंतु एका सर्वसामान्य पातळीवर या कथांमधून मनोरंजनही होते. कदाचित यांची स्वैर रूपांतरे बालकांनाही रुचतील. काही भाग गाळून. आताच्या समाजात आधुनिक शिक्षण घेऊन परंपरागत व्यवसायापासून दूर गेलेले सुशिक्षित धनगर तरुण-तरुणी आढळतात. त्यांना या गोष्टी कशा वाटतात ?







आता सर्वच जातीजमातींत, अल्प प्रमाणात का होईना, परंपरा विस्कटत आहेत. पण उत्सवी मेळाव्यात मात्र 'जुने' जोपासले जाते. उदाहरणार्थ, पूजेला नऊवारी नेसून नथ घालणे, बॉबकटला आंबाडा जोडणे. सर्वच विकसनशील देशात पाश्चात्य वळणाची आधुनिकता आणि परंपरेने चालत आलेल्या धार्मिक समजुती, चालीरिती यांची सरमिसळ झालेली दिसते.

आज आपण कोणाही विद्वानाला 'पगडी' देतो आणि नेत्याला किंवा स्पर्धा जिंकणाऱ्याला 'कोल्हापुरी फेटा' बांधतो. ही शिरोभूषणे ऐतिहासिक काळात विशिष्ट जातींशी निगडित होती. धनगर जमात जर आर्थिक, राजकीय क्षेत्रात प्रबळ असती तर आपण कदाचित विद्वानांना धनगरी पद्धतीचे पांढरट कांबळे शालीऐवजी पांघरले असते. महात्मा फुल्यांनी हंटर कमिशनपुढे जाताना खांद्यावर हेतूपूर्वक घोंगडी घेतली होती. सांस्कृतिक अस्मिता प्रतीकरूपाने व्यक्त करताना बदल होतात, त्यांचे मूळ पाहाणे मनोरंजक असते. ऐतिहासिक सत्ताकारण त्यात महत्त्वाचे ठरते. उदाहरणार्थ, इंग्रजी अमदानीतला पदवीसाठी वापरला जाणारा गाऊन आणि कॅप स्वातंत्र्यानंतरही बराच रेंगाळत राहिला होता.

आता प्रत्यक्ष मजकुरातील काही त्रुटींविषयी. कथांची भाषा धनगरी बोली असली तरी सहज समजते. अडेल तिथे तळटीपा आहेतच. काही इंग्रजी शब्दांचे अपभ्रंशही या कथांतून दिसतात. 'टायम' 'डूटी' वगैरे. म्हणजे भाषेचा बदल. पण याबद्दल कुठेच विवेचन नाही. त्याची कालनिर्देशासाठीची उपयुक्तता दर्शवलेली नाही. शेवटी काही नजरचुका : पान ३२, टीप ६२ यामधे किस्तचा अर्थ 'किती' दिला आहे. तो वास्तविक 'कसलं' असा हवा. पान ४४, वरून ओळ २२ यात 'ह्याज तीला' असा विग्रह केला आहे. तो चुकीचा असून 'ह्याजतीला' हा एक शब्द हवा. तो 'इज्जतीला' याचे बोली रूप आहे.

तपशीलवार सर्व त्रुटी देण्याचा मोह टाळते. संपादकांनी खातरजमा करावी.

'शिंग्रुबा'ची गोष्ट ही रेल्वे बांधताना घडली आणि लोककथा बनली. याचेही महत्त्व विशद करायला हवे होते.

या गोष्टी वाचताना ठायीठायी ओळखीच्या खुणा भेटतात. 'पुरुषमानस' आणि 'स्त्रीमानस' यावर प्रकाशझोत टाकतात. मालक व नोकर यांच्यातील एकतर्फी सत्तावाटणी, दुटप्पी न्याय दाखवतात. आजही वास्तव तसेच आहे. लोकशाहीपासून दूर. फक्त संकलन असूनही हे पुस्तक विचारांना चालना देते. ■

मन:श्री आपर्टमेंट्स, 163/16 डी.पी.रोड, औंध, पुणे 411 007.
दूरध्वनी : 020-25881099

# 'संस्कृत साहित्य परिचय'

सरोजा भाटे

[परीक्षित पुस्तक : 'संस्कृत साहित्य परिचय' - व.भ. उत्पात. स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे. २००५. पृष्ठे २६०, किंमत रु. २००/-]

'संस्कृत साहित्य परिचय' हा श्री. वसंत भ. उत्पात यांचा दुसरा ग्रंथ. 'मराठी भाषा सौष्ठव' हा त्यांचा पहिला ग्रंथ फारच गाजला आणि त्याला राज्य पुरस्कारही मिळाला असे प्रस्तावनेत वाचल्यानंतर या ग्रंथाविषयीच्या अपेक्षा उंचावल्या. तसे संस्कृत साहित्याचा मराठीत परिचय करून देणारे ग्रंथ मोजकेच. त्यांना वाचकही कमी भेटतात. या पार्श्वभूमीवर हे पुस्तक लिहिण्याचे धाडस केल्याबद्दल लेखकाचे अभिनंदन करायला हवे. सेवानिवृत्तीनंतर ''लोक निवांत झोपून वेळ घालवतात; पण वसंतराव निवृत्तीचा काळ व्यासंगात व ग्रंथलेखनात घालवत आहेत हे प्रशंसनीय आहे.'' (प्रस्तावना पृ. १२) याबद्दलही दुमत होण्याचे कारण नाही. ''संस्कृत भाषा ही किती सुरेख आहे, तिचं महत्त्व, तिचा विस्तार आणि तिच्याच (त?) अंतर्भूत असलेले जवळजवळ सर्व विषय प्रस्तुतच्या ग्रंथात समाविष्ट केलेले आहेत.'' (मनोगत पृ. ९) ही या पुस्तकाची प्रतिज्ञा. २६० पृष्ठाच्या या पुस्तकात संस्कृत भाषा, वैदिक साहित्य, लौकिक भाषेतील व्याकरण, शब्दकोश, संगीत, महाकाव्य, गीतिकाव्य, गद्यकाव्य, कथासाहित्य, नाटक, अलंकारशास्त्र, पुरुषार्थसाहित्य आणि मोक्षशास्त्र इतक्या विषयांवरचे लिखाण म्हणजे खरोखरीच लेखकाने म्हटल्याप्रमाणे 'गागरमें सागर' आहे. संशोधक, संस्कार, विवाहप्रकार, अध्यापक प्रकार, महाभारतावर आधारित वाङ्मय, धर्मशास्त्रातील निबंध, भारताबाहेर संस्कृतचा प्रभाव आणि वैदिक धर्मग्रंथ या विषयांचा परिचय आठ वेगवेगळ्या परिशिष्टात देऊन शेवटी शब्दार्थ व टिपा आणि संदर्भग्रंथ-सूची जोडून पुस्तकाच्या आशयघनतेत भर घातली आहे.

संस्कृत साहित्याचा करून दिलेला हा परिचय सर्वसामान्य वाचकाला उद्बोधक वाटेल. मनोरंजक वाटेल की नाही याबद्दल शंका आहे. साहित्यविषयक तपशील स्थूलमानाने बरोबर आहेत. एकूण पुस्तकात लेखकाचे संस्कृतप्रेम आणि सामाजिक





अनुक्रमणिका

जाणीव यांचे प्रतिबिंब उमटले आहे.

थोडे बारकाईने वाचल्यानंतर मात्र या पुस्तकात अनेक मुद्रणदोष आढळतात. विशेषत: संस्कृतविषयक लिखाण करताना व्याकरणशुद्धतेची अधिक काळजी घ्यावी लागते. लक्ष (लक्ष्य), शारीरिक (शारीरक), सुरी (सूरि), वैतायन (वैतान), वशिष्ट (वसिष्ठ), निकस (निकष), चाक्षुस (चाक्षुष) यांसारखे चुकीचे शब्द जागोजाग आढळतात. ब्राह्मण शब्द एकदा पुलिंगी आणि एकदा नपुसकलिंगी, एकदा 'चतुष्पाद' आणि एकदा 'चतुष्पात' यांसारख्या विसंगतीही सापडतात. लेखनसरणीत बोली आणि लेखी दोन्हींची सरमिसळ आहे. उद्धृत वचनांचे अर्थ कधी दिले तर कधी दिले नाहीत. संस्कृत अवतरणिकांमध्येही मधूनमधून अशुद्ध प्रयोग दिसतात. आजचा सामान्य वाचकसुद्धा सखोल जिज्ञासा बाळगून असतो हे ओळखून संस्कृत अवतरणिकांचे पत्ते द्यायला हवे होते. उलट आरण्यक शब्द 'अरण्य'ला वुञ् प्रत्यय जोडून बनला आहे अशा अर्धवट उपपत्तीने त्याच्या ज्ञानात काहीच भर पडणार नाही, हेही लक्षात घ्यायला हवे. ''संस्कृत भाषा ही जगातील भाषांमध्ये श्रेष्ठ'' (पृ.१५) ''संस्कृत साहित्याला वैश्विक साहित्यात श्रेष्ठतम स्थान'' (पृ.१७) ''भाषाशास्त्रज्ञ काही म्हणोत; पण भारतीय भाषा या संस्कृत पासूनच झाल्या आहेत'' (पृ.९) ''दाराशिकोहने सर्वप्रथम पन्नास उपनिषदांचा फारसी भाषेत अनुवाद केला.'' (पृ.३७) यांसारखी भावनेपोटी केलेली भोंगळ विधाने टाळली असती तर बरे झाले असते. ''संस्कृत टिकलं तर मराठी टिकेल'' (पृ.८) या तळमळीपोटी लिहिलेल्या या पुस्तकाचा मराठी टिकवायला किती उपयोग होईल हे मराठीच्या जाणकारांनीच ठरवावे. ■

'ऋतु', निर्मलबाग १५/४६ पर्वती, पुणे 411009

दूरध्वनी - 24226854

## धोसतार

टाकी (तालुका उमरगा, जिल्हा लातूर) येथे यादव नृपती रामचंद्रदेव याच्या शिलालेखाचे ठसे घ्यायला गेलो होतो. ठसे घेऊन झाले. ग्रामस्थ मंडळींनी आदराने चहा दिला. एक ग्रामस्थ आपण ट्रकमधून कसे पडलो, सर्वांग रक्ताने कसे भिजले ते सांगत होता. म्हणाला, 'कुडतं, धोसतार समदंच रक्तानं भरलं.' मी विचारलं, 'कुडतं आणि काय ?' तर म्हणाला, 'धोसतार हो !' ग्रामस्थ मंडळी थोडी बुचकळ्यात पडली. पण मला मात्र अधोवस्त्र–धोवस्तार–धोसतार–धोतर या व्युत्पत्तीतील 'धोसतार' हा मधला दुवा गवसल्याचा आनंद झाला होता.

– डॉ. ब्रह्मानंद देशपांडे, औरंगाबाद

# रससरशीत अनुभव देणाऱ्या कविता

विजया चौधरी

[परीक्षित पुस्तक : '॥शरणागताचे स्तोत्र॥', कवी श्री. शशिकांत शिंदे. मानसी प्रकाशन, कोल्हार खुर्द, ता. राहुरी, जि. अहमदनगर. २००५. पृष्ठ ७९, किंमत रु. ८०/-]

'शरणागताचे स्तोत्र' हा शशिकांत शिंदे यांचा पहिलाच काव्यसंग्रह. या संग्रहात ७६ कविता समाविष्ट आहेत. कवितांचा लेखनकाल १९९३ ते २००३ हा आहे.

स्थूलमानाने, या निसर्गकविता आहेत. पण त्यांचे अंत:सूत्र शेतकरी जीवनाशी निगडित आहे. लहरी निसर्ग आणि उद्ध्वस्त होणारे शेतकऱ्याचे आयुष्य हा या कवितांचा विषय आहे. शेतकऱ्याविषयीच्या सहसंवेदनेतूनच कवी कठोर वास्तवावर भाष्य करीत आहे.

कवीने पाऊस व शेतकरी यांच्यातील अविभक्त नात्याचे अनेक पदर उलगडून दाखवले आहेत. 'पर्जन्या', 'पाऊसमाय', 'येई बा पावसा' या काही कविता पावसाने कृपावंत व्हावे म्हणून आळवणी करतात. 'कमाई', 'वहावण्या', 'बदललेल्या रूपाचे वास्तव' अशा काही कविता पावसाच्या भयकारी रूपाचा प्रत्यय देतात. 'दिवस आले', 'मर्तिक', 'ऐन दुष्काळात' अशा काही कविता उद्ध्वस्त शेतकरी जीवनाचा हतबल करणारा अनुभव देतात. क्वचित 'पावसाई', 'आबादी' अशा कविता सुगीच्या आनंदी दिवसांचे चित्रण करतात.

येथे 'केळ हिच्या दांडातली', 'उत्सव', 'जाण' अशा काही प्रेमकविताही आहेत. प्रेमभावना जेव्हा निसर्गाशी संलग्न होऊन येते तेव्हा निसर्गाचेही चेतनीकरण होते.

व्याकुळ करणाऱ्या वेदनादायी अनुभवाच्या पलीकडे जाण्याची अलिप्तता कवीपाशी नाही. त्यामुळे चिंतनाच्या पातळीवर जाऊन सामाजिक, सांस्कृतिक, राजकीय, परिमाणांचा शोध घेण्यात कवी कमी पडतो असे वाटते (अपवाद 'संगर' किंवा 'निर्मम' या कविता). त्यामुळे कारुण्य आणि दाहकता यांचा एकत्र अनुभव देणारी ही कविता काहीशी एकारलेली आहे.

अनुभवाचा प्रामाणिकपणा दर्शविणारी साधी, अनलंकृत, अल्पाक्षरी शैली,








अनुभवाच्या आंदोलनांनुसार बदलत जाणारी अंत:स्थ लय, कवीचा अंत:स्वर प्रकट करणारी छंदसदृश रचना अशी काही भाषेची वैशिष्ट्ये सांगता येतील. कधी कधी एकाच ओळीची पुनरावृत्ती कवितेच्या प्रत्येक कडव्यात केल्यामुळे आशय अधिक गडद तर होतोच, पण कवितेला नादमयताही प्राप्त होते. (उदा० 'दूर पडत्या पावसाने', 'घाटातून फिरताना' या कविता) 'दोन डोळ्यांचा प्रपात' किंवा 'निळ्या भुईचा कापूर' अशा काही दृश्यात्मक प्रतिमा अनुभव अधिक गोचर करतात.

एकंदरीत एक रसरशीत अनुभव देणारा लक्षणीय असा हा कवितासंग्रह आहे. ■

ई-५०३, गार्डन व्ह्यू, राधिका सोसायटी, पर्वतीनगर, सिंहगड रस्ता, पुणे 411030

---

**भाषावार्ता**

## स्पेलिंगमध्ये टप्प्याटप्प्याने बदल

युरोपियन आयोगाने युरोपियन समुदायाची अधिकृत भाषा जर्मनऐवजी इंग्रजीच असेल, असा ठराव संमत केला आहे. त्यासाठी पाच वर्षांच्या नियोजनबद्ध कार्यक्रमातून इंग्रजी स्पेलिंगमध्येही बदल करण्यात येणार आहेत. त्यात सॉफ्ट c ऐवजी काही शब्दांमध्ये s वापरण्यात येईल. त्यामुळे सरकारी कर्मचाऱ्यांच्या आनंदाला उधाण आले आहे. याशिवाय हार्ड c ऐवजी k वापरण्यात येणार आहे. त्यामुळे विविध शब्दांच्या स्पेलिंगमधील गोंधळ दूर होणार असून संगणकावरही काम करणे सोपे होणार आहे. याशिवाय दुसऱ्या वर्षी phऐवजी सरळ f वापरला जाणार आहे. त्यामुळे फोटोग्राफसारखे शब्द आणखी सुटसुटीत स्पेलिंगचे बनणार आहेत. तिसऱ्या वर्षांपर्यंत नागरिकांकडून हे विविध बदल स्वीकारले जाण्याची शक्यता गृहीत धरून आणखी काही महत्त्वपूर्ण बदल केले जातील. काही ठिकाणी अनावश्यकपणे येणारे अक्षर-द्वित्व काढून टाकण्याकडेही कल आहे. याशिवाय सायलेंट असणारी e सारखी अक्षरे काढून टाकण्यात येणार आहेत. चौथ्या वर्षांपर्यंत th ऐवजी z व w ऐवजी v स्वीकारण्यासही जनमत तयार होईल, असा समुदायाचा अंदाज आहे. पाचव्या वर्षी ou असलेल्या शब्दांतून अनावश्यक ठिकाणचा o काढून टाकण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यामुळे पाचव्या वर्षी सरळसरळ उच्चारांप्रमाणे स्पेलिंगवर आधारित भाषा बऱ्यापैकी तयार झालेली असेल. त्यामुळे प्रत्येकाला इंग्रजी आणखी सोपी वाटेल. ■

रवीन्द्र अंबाडकर, दै. सकाळ, ३१-०१-२००७

---



अनुक्रमणिका






**(१) महाबँक भाषाविषयक लेखन पारितोषिकाचे वितरण :**

मराठी अभ्यास परिषदेतर्फे दिला जाणारा व बँक ऑफ महाराष्ट्रचे सहकार्य लाभलेला महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार यंदा प्रा. शंकर सखाराम (पाटील) यांच्या 'शब्दानुबंध' या पुस्तकाला देण्यात आला. पुरस्काराचे वितरण दि. १९ जानेवारी २००७ रोजी पुणे येथील भारत इतिहास संशोधक मंडळाच्या राजवाडे सभागृहात डॉ. नरेंद्र जाधव (कुलगुरू, पुणे विद्यापीठ) यांच्या हस्ते करण्यात आले. अध्यक्षस्थानी प्रा. प्र.ना. परांजपे होते.

कार्यक्रमाची सुरुवात डॉ. सुप्रिया सहस्रबुद्धे यांच्या प्रास्ताविकाने झाली. कार्यवाह डॉ. नीलिमा गुंडी यांनी आमंत्रितांचा परिचय करून दिला व प्रमुख पाहुण्यांना संस्थेचे कार्य व उद्दिष्टे याविषयी माहिती दिली. तसेच संस्थेचे प्रथम अध्यक्ष डॉ. अशोक केळकर यांनी पत्राद्वारे व्यक्त केलेले मनोगत वाचून दाखविले.

परीक्षकांतर्फे डॉ. सुमन बेलवलकर यांनी मनोगत व्यक्त केले. 'भाषानुबंध'मधील प्रत्येक लेख भरीव व अर्थघन आहे असे सांगून समाजाबाहेरच्या आदिजनांचे भाषिक धन आपल्या भाषेत आले पाहिजे असे मत व्यक्त केले. प्रा. शंकर सखाराम यांनी 'ललित' मासिकातील सदर-लेखनाच्या निमित्ताने शब्दांच्या व्युत्पत्तीकडे जाण्याची प्रेरणा मिळाली व त्यामुळेच या पुस्तकाची निर्मिती झाली असे सांगितले.

प्रमुख पाहुणे डॉ. नरेंद्र जाधव यांनी लोकभाषेविषयी आपले विचार स्पष्ट केले. बोलीभाषांना स्वत:चा गोडवा व व्यक्तिमत्त्व असते व ती जेव्हा समाजाच्या सर्व स्तरांतून येते तेव्हा प्रमाणभाषेत सामावली जाऊन प्रमाणभाषा सकस, समर्थ व समृद्ध होते असे ते म्हणाले.

अध्यक्ष प्रा. प्र.ना. परांजपे यांनी मराठीतील सर्व शब्दांचा समावेश असलेला शब्दकोश नाही असे सांगून बोलीभाषांचे वैज्ञानिक दृष्टीने संशोधन होण्याच्या आवश्यकतेवर भर दिला. विद्यापीठांनी तौलनिक भाषा विज्ञान किंवा भाषांतर विभाग सुरू करावेत अशी सूचनाही त्यांनी केली.

डॉ. सुप्रिया सहस्रबुद्धे यांनी आभार मानले.

**(२) 'भाषा आणि जीवन'च्या रौप्यमहोत्सवी वर्षाच्या पहिल्या अंकाचे प्रकाशन :**

मराठी अभ्यास परिषदेला २००६मध्ये २५ वर्षे पूर्ण झाली. २००७ हे वर्ष 'भाषा आणि जीवन' त्रैमासिकाचे रौप्यमहोत्सवी वर्ष आहे. त्या निमित्ताने दि. १६ जानेवारी २००७ रोजी एक विशेष कार्यक्रम आयोजित करून पत्रिकेच्या रौप्यमहोत्सवी वर्षातील पहिल्या अंकाचे प्रकाशन प्रमुख पाहुणे व महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे अध्यक्ष श्री मधु मंगेश कर्णिक यांच्या हस्ते करण्यात आले. अध्यक्षस्थानी प्रा. प्र. ना. परांजपे होते.

डॉ. नीलिमा गुंडी यांनी प्रास्ताविकात संस्थेच्या रौप्यमहोत्सवी वर्षानिमित्त योजलेल्या विविध उपक्रमांची माहिती दिली. संस्थेचे प्रथम अध्यक्ष व 'भाषा आणि जीवन'चे पहिले संपादक डॉ. अशोक केळकर यांचा सत्कार करण्यात आला. तो त्यांच्या अनुपस्थितीत त्यांच्या पत्नी श्रीमती दिशा केळकर यांनी स्वीकारला. संस्थेच्या कार्यकरिणीचे माजी सदस्य डॉ. द.दि.पुंडे, डॉ. यशवंत कानिटकर, डॉ. आशा मुंडले, डॉ. नीती बडवे आदींचा सत्कार करण्यात आला.

संस्थेच्या एक संस्थापक सदस्य - मॅक्सिन बर्नसन, माजी चिटणीस डॉ. मृणालिनी शहा व 'भाषा आणि जीवन'चे माजी संपादक डॉ. कल्याण काळे यांनी आपले मनोगत व्यक्त केले. डॉ. सरोजा भाटे यांनी वाचकांच्या दृष्टिकोणातून आपली निरीक्षणे नोंदविली. पत्रिकेने आपल्या उद्दिष्टांचा विस्तार करावा व समाजाच्या सर्व स्तरांपर्यंत पत्रिका पोचवावी असेही त्या म्हणाल्या.

श्री. मधु मंगेश कर्णिक यांनी भाषेचा विकास लोकभाषा, ज्ञानभाषा, भाषाविषयक धोरणांची संवेदनक्षम अंमलबजावणी यावर अवलंबून असतो असे मत व्यक्त केले. लेखकांनी अर्थवाही असे नवे नवे शब्द शोधून वापरले पाहिजेत असेही त्यांनी आवर्जून सांगितले.

अध्यक्ष प्रा. प्र. ना. परांजपे यांनी भारताचे धोरण सर्व भाषांना वाव देण्याचे व त्यांचे स्वत्व टिकविण्याचे आहे याकडे लक्ष वेधले. डॉ. अशोक केळकर यांनी पत्राद्वारे पाठविलेले निवेदनही त्यांनी वाचून दाखविले.

डॉ. गं.ना.जोगळेकर यांनी आभार-प्रदर्शन केले.

**(३) देणगी :**

मराठी अभ्यास परिषदेच्या रौप्यमहोत्सवानिमित्त डॉ. लीला दीक्षित यांनी परिषदेला रु. ५००/ची देणगी दिली आहे. या अनुकरणीय आपुलकीबद्दल डॉ. लीला दीक्षित यांना धन्यवाद.

■

# मराठी पदनामांची लिंगे

गीता भागवत

[संदर्भ : भाषा आणि जीवन : २४:४/ दिवाळी २००६, पृ. ६२ ते ६४वरचा कैलास सार्वेकर यांचा 'भाषेतील लिंगभेद, पदनामं आणि बहुवचनं' हा स्फुट-लेख]

'मराठीमधल्या पदनामांची पुलिंगी आणि स्त्रीलिंगी रूपे भिन्न असतात' आणि 'मराठीत त्यांची वेगळी-स्त्रीलिंगी रूपं वापरणं क्वचित ठिकाणी अधिक प्रतिष्ठित/सुसंस्कृत/परिणत प्रज्ञेचं मानलं जातं' ही कैलास सार्वेकरांची विधाने व त्यांच्या अनुषंगाने केलेले विवेचन सामान्यजनांचा बुद्धिभेद करणारे ठरेल.

पदनामे ही प्रशासनिक भाषेमधील पारिभाषिक संज्ञा आहेत. सामान्य भाषेतील व्यवहारामधले शब्द आणि विशिष्ट कार्यक्षेत्रातील (येथे प्रशासन क्षेत्रातील) पारिभाषिक शब्दपर्याय यांची गल्लत करणे योग्य नाही. तसेच नामांचे व्याकरणिक लिंगभेद आणि त्या नामानी निर्देशित होणाऱ्या पदार्थांचे लिंगभेद यांचीही गल्लत करणे योग्य नाही.

सामान्य व्यवहारातील मराठी भाषेत स्त्री-व्यवस्थापकासाठी 'व्यवस्थापिका' किंवा स्त्री-प्राचार्यासाठी 'प्राचार्या' असे पर्याय उपलब्ध आहेत हे खरे असले तरी ते पर्याय म्हणजे पदनामे नव्हेत. सामान्य व्यवहारात संबोधताना किंवा व्यक्ती म्हणून उल्लेख करताना प्राचार्या किंवा व्यवस्थापिका असे स्त्री-दर्शक शब्द वापरले जाऊ शकतात, पण ते पदनाम म्हणून स्वीकारले जाता कामा नयेत; स्वीकारले जात नाहीत.

संचालक, प्राचार्य अशा पदनामांमध्ये पुरुष व स्त्री दोन्ही अभिप्रेत आहेत. म्हणूनच कोशामध्ये त्यांच्यापुढे 'सामान्यलिंगी' असा निर्देश असतो. ही पदनामे सामान्यलिंगी आहेत म्हणूनच संचालक, प्राचार्य, व्यवस्थापक अशा निर्देशाने जाहिरात दिलेल्या पदावर पुरुष व स्त्री दोघेही अर्ज करू शकतात, निवडले व नेमले जाऊ शकतात, काम करू शकतात. प्रशासनातील पत्रव्यवहारात संबोधताना, अहवाल देताना - लिहिताना, आदेश देताना, पदे मंजूर करताना, पदनामांच्या पाट्या तयार करताना पदावरील व्यक्ती स्त्री असो वा पुरुष, पदाच्या नामात बदल केले जात नाहीत. कारण प्रशासनिक व्यवहार हे निरंतर चालणारे, पदसापेक्ष व व्यक्तिनिरपेक्ष असतात.

'प्राचार्य स्वत: बैठकीस हजर राहतील' किंवा 'याबद्दल संचालकांनी आपला








अभिप्राय द्यावा' अशा आदेशांना अनुसरून त्या त्या पदाचे काम करणाऱ्या/ते पद धारण करणाऱ्या व्यक्तीने प्रतिसाद द्यायलाच हवा. मग ती व्यक्ती स्त्री असो वा पुरुष !

■

९, रानडे कॉटेज सोसायटी, परांजपे 'बी' स्कीम, तिसरा रस्ता, हनुमान रोड, विलेपार्ले (पूर्व) मुंबई 400057. दूरध्वनी क्रमांक 022-26117773

---

प्रतिसाद-२

# संक्षिप्त रूपे : पूर्ण रूपांमागील हेतूचा पराभव !

क. कृ. क्षीरसागर

'भाषा आणि जीवन' हिवाळा ०७च्या अंक एक मधील 'संक्षिप्तरूपे : भाषिक काटकसर आणि सर्जकता'च्या सर्जकतेत भर घालणारी आणखी काही संक्षिप्तरूपे पुढीलप्रमाणे : (पण त्यातील काहींमुळे मूळ पूर्ण रूपांचा अपेक्षित हेतू आणि अर्थ विपरीत होतात. तेव्हा त्यांचा संक्षिप्त स्वरूपातील वापर तसा अयोग्यच. व्यवहार्यता महत्त्वाची की हेतू ? याचाही विचार नको का व्हायला ?) डी.एन. रोड = दादाभाई नौरोजी रोड, एस्.व्ही. रोड = स्वामी विवेकानंद रोड, सीएसटी = छत्रपती शिवाजी टर्मिनस इ. डॉक्टरांच्या क्लिनिकमधील भाषाही आता खूपच रुळली आहे. ''इसिजीनंतर अँजिओ करून घ्या म्हणजे बायपास करायची की अँजिओप्लास्टी ते ठरविता येईल.'' ''त्याआधी हवी तर डॉप्लर करून घ्या.'' ''बीपीवर नियंत्रण ठेवा. इ. इ.''

बँकेत गेलात तर डीडी पाठवायला विसरू नका. त्यासाठी एटीएममधून किंवा नेटबँकिंग द्वारा पैसे काढा. वेळ वाचवायला पीएमटीने जा. बिआरटीचा वापर करा नाहीतर ऑटो किंवा बाईक आहेच. लवकर पोहोचा म्हणजे 'ट्यूट' ही लिहू शकाल आणि क्यूट दिसाल. मग ट्रीटही मिळेल.

■

प्लॉट १०, बापट बंगला, सुनीता सोसायटी, पुणे 411 004.

---

--

रमेश पानसे

'भाषा आणि जीवन'च्या हिवाळा २००७ या अंकात मिलिंद मालशे लिहितात (पान १८) ''भाषेविषयी एक वर्तनवादी भूमिका १९३०-१९५५ या कालखंडामध्ये मान्यता पावलेली होती... वर्तनवादी भूमिकेमध्ये मानवाच्या मनाविषयी, ज्ञानशक्तींविषयी, त्याचप्रमाणे भाषेविषयी पुरेसा व्यापक स्वरूपाचा सिद्धान्त नव्हता....''

विसाव्या शतकात पूर्वार्धात (केवळ १९३०-१९५५ नव्हे !) वर्तनवादी विचारसरणी प्रसृत झाली, पसरली, प्रतिष्ठित झाली आणि व्यापक झाली. ही विचारसरणी भाषेविषयीची नव्हती, तर ती एकूण शिक्षणाविषयीची होती. त्यात मग भाषाही आलीच. तसेच ज्ञानक्षेत्रावर मोठा प्रभाव पाडण्याइतका वर्तनवादाचा सिद्धान्त व्यापक होता. वर्तनवाद हा शिक्षणाचा संदर्भातला पण मानसशास्त्राच्या क्षेत्रातला एक सर्वसाधारण असा दृष्टिकोण होता. 'वर्तनवाद' (इंग्रजीत 'बिहेवियरिझम') ही संज्ञा जॉन बी. वॉटसन यांनी जन्माला घातली आणि आपल्या 'सायकॉलॉजी फ्रॉम द स्टँडपॉइंट ऑफ अ बिहेवियरिस्ट' या १९१९ साली प्रकाशित झालेल्या ग्रंथात वापरली आणि एक दृष्टिकोण म्हणून ती मानसशास्त्रातून शिक्षणशास्त्रात प्रवेशली.

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस आणि विसाव्या शतकाच्या सुरुवातीस मानसशास्त्राच्या संदर्भात दोन महत्त्वाच्या घटना घडून आल्या. एक, तोवरची मानसशास्त्राची तत्त्वज्ञानाशी जोडलेली नाळ तुटून, मानसशास्त्र हे एक स्वतंत्र शास्त्र म्हणून प्रस्थापित होऊ लागले; आणि दोन, मानसशास्त्राला एक वस्तुनिष्ठ शास्त्र म्हणून उभे करण्याचा प्रयत्न झाला. या दुसऱ्या घटनेचा प्रणेता प्रामुख्याने वॉटसन होता.

विसाव्या शतकाच्या सुरुवातीस, मानवी मनाचा ठाव घेण्यासाठी 'आत्मचिकित्से'ची (इंट्रॉस्पेक्शन) पद्धती प्रचलित होती. वॉटसनने आपल्या उपर्युक्त ग्रंथात या पद्धतीच्या मर्यादा दाखवून दिल्या आणि या पद्धतीत वस्तुनिष्ठता नसल्यामुळे ती पद्धती त्याने नाकारली. त्याऐवजी, प्रत्यक्षात ज्याचे निरीक्षण करता येईल अशा बाह्य मानवी वर्तनाला मध्यवर्ती स्थान देऊन, त्याद्वारे मानवी मनाचा शोध घेता येईल,

अशी भूमिका वॉटसनने घेतली. याचे शैक्षणिक पर्यवसान असे की, शिक्षणाची निरीक्षणयोग्य अशा वर्तनबदलाशी सांगड घालण्यात येऊन, शिकणे म्हणजे वर्तनात बदल घडून येणे, असे मानले गेले. 'शिक्षणा'ची व्याख्याही, 'वर्तनातील अपेक्षित बदल म्हणजे शिक्षण' अशी करण्यात येऊन, त्यायोगे शिक्षणव्यवस्था व शिक्षणव्यवहार यांना वळण मिळत गेले. इव्हान पावलाव, थॉर्नडाईक, वॅगनर, स्किनर ही सारी संशोधक मंडळी या वर्तनवादी विचारसरणीशी संबंधित मंडळी असून त्यांनी ही विचारसरणी आपल्या प्रयोगशाळांतील संशोधनांच्या आधारे प्रस्थापित केली; त्यांची नीटसपणे सैद्धान्तिक मांडणी केली.

आता थोडेसे, चॉम्स्की यांच्या वर्तनवादी विचारसरणीवरील आक्षेपांविषयी. नोम चॉम्स्की यांनी वर्तनवादावर जहरी टीका केली आहे, तिचे मुख्य कारण असे की भाषा आत्मसात करण्याचा जो गुंतागुंतीचा व्यवहार आहे, तो वर्तनवादाला स्पष्ट करता येत नाही. वर्तनवाद असे मानतो कीं, मानवी मन ही जन्मत:च एक कोरी पाटी असते आणि त्यावर आपल्याला (समाजाला, शिक्षकाला) अपेक्षित असलेल्या वर्तनाची मोहोर उठविता येते. थोडक्यात असे की सर्व गोष्टी 'शिकवून'च येतात. चॉम्स्की दाखवून देतात की, भाषेचा व्यवहार हा अत्यंत गुंतागुंतीचा व्यवहार असला तरी मूल अगदी लहान वयात व न शिकवताही सहजतेने आणि अत्यंत अल्प कालावधीत भाषा आत्मसात करते. याचा अर्थच असा की जन्मत:च त्याची पाटी कोरी नसते; त्याच्याजवळ उपजत क्षमता असतात. भाषा आत्मसात करण्याचे सामर्थ्य या मानवी मेंदूमधील उपजत क्षमतांशी संबंधित असते.

चॉम्स्कींचा वर्तनवादावरील सात्विक राग यामुळे आहे, की वर्तनवाद माणसाला अगदी निर्जीव वस्तूच्या पातळीवर नेऊन ठेवतो : व्यक्तीला जणू काही स्वत:ची स्वतंत्र अशी, स्वत:चे वर्तन ठरविणारी प्रज्ञाच नाही, इच्छाशक्तीच नाही, अंत:प्रेरणाच नाही. स्किनरबाबत चॉम्स्कीने विधान केले आहे की, त्याने माणसाची स्वयंप्रेरणाच हिरावून घेतली आहे आणि तिच्या जागी बाह्य वातावरणाची नियुक्ती केली आहे.

अर्थात वर्तनवादावर टीका करणारा चॉम्स्की हा एकटाच शास्त्रज्ञ नाही. त्याने भाषेच्या अंगाने टीका केली आहे. आज शिक्षणक्षेत्रात वर्तनवादाची जागा घेणारे रचनावादासारखे शिक्षणाला अधिक वास्तवाकडे नेणारे दृष्टिकोण निर्माण झाले आहेत, वर्तनवादी विचारसरणीची खूपच कठोर तपासणी चालू आहे. विसाव्या शतकाच्या मध्याला उच्चस्थानी गेलेला वर्तनवाद आज अनेक ज्ञानक्षेत्रांमध्ये नाकारला जात आहे.

■

एच-२०, पिनाक मेमरीज्, फेज २, कोथरूड, पुणे 411038





अनुक्रमणिका

# 'मालप्रॉपिजम' आणि 'वक्रतुंडी भाषित'

माधवी आपटे

दिवाळी २००६च्या अंकातील (भाषा आणि जीवन, वर्ष २४, अंक ४) माझ्या परीक्षणात्मक लेखातील 'वक्रतुंडी भाषित' या 'मालप्रॉपिजम' या संज्ञेच्या पर्यायाला घेतलेल्या आक्षेपावर राजीव नाईक यांनी प्रतिसादात्मक टिप्पणी लिहिली आहे. त्यांच्या दाव्यानुसार श्रीमती मॉलप्रॉप आणि वक्रतुंड हे जवळचे नातेवाईक म्हणून सहज ओळखता येतील. भाषाविज्ञान आणि वाङ्मयविद्या परिभाषा कोषाचे कोषकार यांनाही अशी जवळीक अभिप्रेत असावी. हा युक्तिवाद एकाच वस्तुस्थितीवर आधारित असण्याची शक्यता आहे आणि ती म्हणजे ही दोन्ही पात्रे भाषिक विनोद निर्माण करतात. परंतु त्यांचा भाषिक विनोद अगदी भिन्न स्वरूपाचा आहे. श्रीमती मालप्रॉप हे पात्र उच्चार-साधर्म्य असलेले मोठमोठे शब्द वापरताना जो घोटाळा करते त्यांतून भलतेच विचित्र अर्थ निघतात आणि त्याची या पात्राला काहीही जाणीव नसते. उदा० 'ऑब्लिटरेट' ऐवजी 'इल्लिटरेट', 'आयरॉनिकली'ऐवजी 'लकॉनिकली', 'कन्टीग्युअस'ऐवजी 'कन्टॅजिअस', 'सुपरफ्लुअस'ऐवजी 'सुपरस्टिशस', 'प्रॉपजिशन'ऐवजी 'प्रेपजिशन' इ० इ०

याउलट वक्रतुंड हा जाणूनबुजून संस्कृतमिश्रित जड भाषा वापरतो. रागोपंताच्या मते त्याला ''गीर्वाणभाषेचे अजीर्ण'' आहे तर वक्रतुंडाच्या स्वतःच्या शब्दात ''मी गीर्वाण भाषेत स्थिर असून शब्दशास्त्रात उच्छृंखल आहे.'' याशिवाय वक्रतुंडाच्या संस्कृतमिश्रित जड भाषेतून त्याला अपेक्षित असलेला अर्थच प्रगट होतो. म्हणायचे एक पण अर्थ भलताच असे होत नाही. त्याच्या भाषेची उदाहरणे या विधानाला पुष्टी देतील. उदा० 'शुष्कपर्णावगुंठित तमाखुपत्र' म्हणजे विडी, 'कूपजलात अवगाहन' म्हणजे विहिरीच्या पाण्याने आंघोळ, 'अवगुंठनवती शिबिका' म्हणजे आच्छादित दमणी, 'उन्मिलीत शकट' म्हणजे उघडी गाडी इ० म्हणून मालप्रॉपिजम म्हणजे वक्रतुंडी भाषित नाहीच. ■

१४-१ब, मित्रमंडळ कॉलनी, नवा उस्मानपुरा, औरंगाबाद 431005
भ्रमणध्वनी - 9325212341







## भाषाविषयक लेखनसूची : २००६

-यशोधरा पवार

### पुस्तके

करंदीकर, सुरेश आणि मीना मंगरुळकर/ प्रथम भाषा प्रादेशिक भाषा-मराठी/ कोल्हापूर : फडके प्रकाशन/२००६/ पृ ६ +२५९/रु. ७०/-

धोंगडे, रमेश/ सामाजिक भाषाविज्ञान/पुणे : दिलीपराज प्रकाशन/२००६/पृ.२००/ रु. १९०/-

धोंगडे, रमेश/भाषा आणि भाषाविज्ञान/ पुणे : दिलीपराज प्रकाशन/२००६/ पृ. २२४ / रु. २५०/-

योगेंद्र कुमार / रशियन-मराठी शब्दकोश/ पुणे : मॅगपाय प्रकाशन/२००६/ पृ.(१६), २८२/रु. २००/-

लेले, वामन केशव/वाक्यकोश भाग ३/ पुणे : राजहंस/२००६/ पृ. ११, २२८/ रु.१००/-

### लेख

(अग्रलेख) 'वाघिणीचे दूध'/महाराष्ट्र टाइम्स /१२जून/ पृ.६

कडवेकर, श्री. वि. /'मराठीला अभिजात भाषेचा दर्जा हवाच !' /सकाळ / ४ फेब्रुवारी /पृ. ४

कामत, उमाकांत रामचंद्र / 'भाषेचे मानवनिर्मित रूप आणि मराठी व्याकरणात विभक्ती संकल्पनेचा पुनर्विचार' / मराठी संशोधन पत्रिका २००६/जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर (वर्ष ५२ अंक ४)/पृ. २ ते १३

चव्हाण, गजानन/भाषांतराच्या चिकित्सक अभ्यासाची गरज/लोकसत्ता/३०सप्टेंबर/ पृ.६

जाधव, मंजुषा/तर मराठी शाळांविषयीचा न्यूनगंड दूर/ महाराष्ट्र टाईम्स/२२जून/ पृ.६

जाधव,मंजुषा/'मराठीतून जागतिकीकरण' /महाराष्ट्र टाईम्स/२६ डिसेंबर/पृ. ६

जोशी, माधवी/'संस्कृतला गतवैभव प्राप्त करण्यासाठी'/सकाळ/३ एप्रिल/ पृ. ४

जैन, आर. एस./'बहुभाषिकत्व - आजच्या काळाची गरज'/सकाळ/२३ फेब्रु./पृ.४

तळवलकर, गोविंद/ 'सांस्कृतिक राष्ट्रवादाचा धोका' /महाराष्ट्र टाईम्स/८ डिसेंबर/पृ. ६

नाईक, सुरेखा कमलाकर/'प्रशासनिक मराठीची परंपरा'/मराठी संशोधन पत्रिका/एप्रिल-मे-जून (वर्ष५२/अंक ३)








**परब**, प्रकाश/'मराठी भाषेचा प्रश्न : एक दृष्टिक्षेप'/ महाराष्ट्र टाइम्स /२७ फेब्रुवारी/ पृ. ६

**परब**, प्रकाश/ 'मराठी भाषेचा प्रश्न नेमका आहे तरी काय ?'/लोकसत्ता/६ मे / पृ. ६

**परब**, प्रकाश/'मराठी भाषा : समस्या व उपाय'/ मराठी संशोधन पत्रिका /एप्रिल-मे-जून (वर्ष ५२ अंक ३)/पृ. ४९ ते ५६

**भाटे**, सरोजा/'संस्कृत : काल, आज आणि उद्या' /सकाळ/९ऑगस्ट/पृ. ४

**भावे**, नीलिमा / 'भाषा भगिनी' /ललित /सप्टें २००६/पृ. २५-२८

**मणेरीकर**, प्रसाद / 'बालभारतीने गिरविलेले चुकांचे धडे'/महाराष्ट्र टाइम्स/९जून/पृ.६

**मेंडजोगी**, वि.प्र./'शुद्धलेखन : काही उपाय'/केसरी/२६ डिसेंबर /पृ. ४

**राऊत**, भारतकुमार/'मराठी होती अमुची Mother toungue'/महाराष्ट्र टाइम्स' २६ फेब्रुवारी/(पुरवणी : संवाद) पृ. २

**वाघ**, विठ्ठल/'बोलीचा बोलबाला.'/ सकाळ/१८ ऑगस्ट/पृ.६

**विनोद**, संप्रसाद/'मराठीची नाळ'/सकाळ (सप्तरंग)/११जून/पृ.१

**सहस्रबुद्धे**, वर्षा/'भाषाशिक्षण कस कसावे?' /लोकसत्ता (चतुरंग पुरवणी)/२८ जानेवारी /पृ.१

**संगा**, पाडुरंग / 'उत्खनन भाषेच्या इतिहासाचे'/लोकसत्ता/आंतरभारती/ डिसेंबर/पृ.६

**संगोराम**, मुकुंद/'मराठी असे अमुची मायबोली, तिला बैसवूं वैभवाच्या शिखरी /लोकसत्ता/२९ नोव्हेंबर/पृ.६

**सामंत**,सत्त्वशीला /'प्रमाण भाषेशी विद्रोह हा स्वजन द्रोहच !/२१ फेब्रु/महाराष्ट्र टाईम्स/पृ.६

**हर्डीकर**, रोहिणी/'खेळ खेळता शब्दांशी' अनुभव/ऑगस्ट २००६/पृ. २८-३२

**हळबे**, मालती/'मराठी शुद्धलेखन प्रदीप : परीक्षण'/मराठी संशोधन पत्रिका (अंक ४ वर्ष ५२)/पृ. १४ ते ५२

## वाचक पत्रे: (नाव/अंक: पृष्ठ)

**दै.** महाराष्ट्र टाइम्स / ८ फेब्रु/१६मार्च/ ३०मार्च/१२जून/२०सप्टें/२०ऑक्टो २६ऑक्टो/८ नोव्हें/१२डिसे. २९डिसें/ (सर्व पत्रे पृ. ६वर)

**दै.** सकाळ १३ फेब्रु/२२ फेब्रु/७ एप्रिल/ ८ एप्रिल/७ जुलै/(सर्व पत्रे पृ. ४वर) २५ जुलै/१ सप्टें/१३ सप्टें/१० ऑक्टो/२६ ऑक्टो/९ डिसें/१८ डिसें/ २८ डिसें/ २ ऑक्टो.(मुक्तपीठ) पृ.२ (सर्व पत्रे पृ. ४वर)

**दै.** लोकसत्ता/१६ सप्टें/३० सप्टें/ १७ ऑक्टो/ २० ऑक्टो/२५ नोव्हें./ १२डिसें/२१डिसें. (सर्व पत्रे पृ. ६वर)

**दै.**लोकमत, ८ फेब्रु/९ फेब्रु/२४ फेब्रु/ १८ मे/२२ मे/९ ऑगस्ट/२७ ऑक्टो (सर्व पत्रे पृ. ४वर)

लेखक-परिचय

- जयश्री आनंद काटीकर : पुणे विद्यापीठातून एम.ए. (मराठी), मॅकमिलन इंडियामध्ये १९९९ ते २००२पर्यंत उपसंपादक व २००२ ते २००४पर्यंत संपादक.

- डॉ. कल्याण काळे : एम.ए.,पीएच.डी.(मराठी). बार्शी, नंदुरबार, पुणे येथे अध्यापन. पुणे विद्यापीठातून प्रोफेसर व विभाग प्रमुख म्हणून निवृत्त. २० पुस्तके, १५०पेक्षा अधिक लेख. भाषाविज्ञान, संतवाङ्यम हे विशेष अभ्यासाचे विषय. 'भाषा आणि जीवन'चे सुमारे आठ वर्षे प्रमुख संपादक.

- विश्वनाथ खैरे : केंद्रीय बांधकाम खात्यातून अभियंता म्हणून निवृत्त. संस्कृत, मराठी व तमिळ (संमत') या भाषांच्या परस्परसंबंधांचा विशेष अभ्यास. प्राचीन मिथ्यकथा, प्राचीन भारतीय संस्कृती व परंपरा या विषयांसंबंधी लेखन. पुस्तकांना शासनाची पारितोषिके.

- डॉ. नीलिमा गुंडी : स.प.(कनिष्ठ) महाविद्यालय, पुणे येथे मराठीच्या प्राध्यापक. 'कविता : विसाव्या शतकाची'च्या सहसंपादक. कवितासंग्रह व बालसाहित्य प्रकाशित. मराठी अभ्यास परिषदेच्या चिटणीस.

- विजया चौधरी : मुंबई विद्यापीठातून एम.ए. (मराठी), पंजाब नॅशनल बँकेच्या अधिकारी-पदावरून स्वेच्छानिवृत्त. 'स्त्री-साहित्याचा मागोवा'च्या तिसऱ्या खंडामध्ये लेखन-सहयोग. मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यकारिणीच्या सदस्य.

- डॉ. विद्यागौरी टिळक : मराठी विषयात एम.ए.,एम.फिल.,पीएच.डी. सोमेश्वरनगर (जि.पुणे) येथे १९८६ ते १९९६पर्यंत अध्यापन. १९९६पासून पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात प्रपाठक. 'मराठी वाङ्मयाची सद्य:स्थिती' (सहसंपादन), 'वाङ्मयेतिहास-लेखन - स्वरूप आणि संपादन' (संपादन),'समीक्षा-विविधा' (संपादन) ही प्रकाशित पुस्तके. कथा, कविता, लेख इ० स्फुट लेखन.

- डॉ. माणिक धनपलवार : उस्मानिया विद्यापीठ, हैदराबाद येथील मराठीचे (निवृत्त) प्राध्यापक. अनेक पुस्तके व शोधनिबंध प्रकाशित.

- डॉ. रमेश पानसे : अर्थशास्त्राचे निवृत्त प्राध्यापक. ठाणे जिल्ह्यातील आदिवासी भागात विकास व शिक्षणविषयक प्रयोग. अर्थशास्त्र, समाजकार्य व शिक्षण या विषयांत ग्रंथलेखन. २५पेक्षा अधिक स्वतंत्र व संपादित पुस्तके. 'शिक्षणपत्रिका' मासिकाचे संपादक. 'बाल-शिक्षण संशोधन व विकासकेंद्राचे संचालक. सामाजिक कार्यासाठी अनेक पुरस्कारांनी सन्मानित. महत्त्वाचे ग्रंथ - 'शिक्षण आनंदक्षण', 'कर्ता-करविता : आधुनिक मेंदुसंशोधन व आपले जीवन', 'शिक्षण : सामाजिक परिवर्तनाची चळवळ' इ.

- डॉ. उज्ज्वला बर्वे : पुणे विद्यापीठातून एम.ए.(रशियन),एम.सी.जे.,पीएच.डी. (कम्युनिकेशन अँड जर्नलिझम), सध्या पुणे विद्यापीठाच्या संज्ञापन व वृत्तपत्र-विद्या-विभागात अधिव्याख्याता. दूरदर्शनवरील महाचर्चेच्या सूत्रसंचालक. ऑस्ट्रेलियन नभोवाणीसाठी मराठी वृत्तलेखक व निवेदक. दिल्लीवरून ध्वनिक्षेपित होणाऱ्या राष्ट्रीय मराठी बातमीपत्राच्या काही वर्षे वृत्तनिवेदक.

- **डॉ. सुमन बेलवलकर :** शिवाजी विद्यापीठातून एम्.ए.(मराठी), 'लीळाचरित्रातील सामाजिकतेचे चित्रण' या विषयावर पीएच.डी. सर्व परीक्षांत प्रथम क्रमांक व अनेक पारितोषिके. राष्ट्रीय शिष्यवृत्तीने सन्मानित. १९७० ते ८०पर्यंत विविध महाविद्यालयांत अध्यापन, १९८०पासून पश्चिम विभागीय भाषाकेंद्र येथे अमराठी विद्यार्थ्यांना मराठीचे अध्यापन. सध्या तिथे प्राचार्य. 'बेलभाषा', (भाषाविषयक स्फुटलेखन) व 'मराठी शारदियेच्या चंद्रकळा' (संपादन) ही पुस्तके प्रकाशित. याशिवाय लेख, मुलाखती, परीक्षणे, नभोवाणीवर भाषणे.
- **डॉ. सरोजा भाटे :** पुणे विद्यापीठातून एम.ए.,पीएच.डी. (संस्कृत), तेथूनच संस्कृतच्या प्रोफेसर व विभागप्रमुख म्हणून निवृत्त, भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेच्या तीन वर्षे मानद सचिव.
- **आशा मुंडले :** भाषाविज्ञान व समाजशास्त्र या विषयात डेक्कन महाविद्यालयातून एम.ए. (१९६०), १९६२ ते ६६मध्ये शिकागो विद्यापीठाच्या मुंडा प्रकल्पात संशोधन अधिकारी व मानववंशशास्त्र विभागात विद्यार्थी, १९६७ ते ७१मध्ये दिल्लीला राष्ट्रीय शिक्षण संशोधन व प्रशिक्षण मंडळात (एन.सी.इ.आर.टी.) अधिव्याख्याता. १९७५ ते ९५ या वर्षांत लेस्ली सॉनी नेतृत्व प्रशिक्षण प्रकल्पात अभ्यागत अध्यापक. महात्मा जोतीबा फुले यांच्या 'शेतकऱ्याच्या आसूड'चे महाराष्ट्र सरकारसाठी इंग्रजीत भाषांतर. 'निरक्षरांचे जग' व 'निढाली माणसं' ह्या समाज शिक्षण-मालेतील पुस्तकांचे लेखन. 'घर' हे वैचारिक सदर लेखनाचे पुस्तक (श्री विद्या प्रकाशन), अमराठी विद्यार्थ्यांसाठी 'अशी आहे मराठी' (एन.सी.ई.आर.टी.) १९७२पासून पुण्यात स्थायिक व अमराठी विद्यार्थ्यांना मराठीचे अध्यापन. स्त्री, रोहिणी, साप्ताहिक सकाळ अशा अनेक नियतकालिकांत वैचारिक स्फुटलेखन.
- **डॉ. सुप्रिया सहस्त्रबुद्धे :** एम.ए.,पीएच.डी. (इंग्लिश), मॉडर्न महाविद्यालय (गणेशखिंड) येथे अधिव्याख्याता. 'आदिमाया' (मीरा तारळेकर) या मराठी कवितासंग्रहाचे हिंदीमध्ये व 'हिंदुत्व' (ज्योर्तिर्मय शर्मा) या पुस्तकाचे इंग्रजीतून मराठीमध्ये भाषांतर. अमर्त्य सेन यांच्या पुस्तकाचे भाषांतर प्रकाशनाच्या मार्गावर.

---

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. वार्षिक वर्गणी - संस्थेला रु. १२५/-, पंचवार्षिक वर्गणी रु. ५५०/-, व्यक्तीला रु. १००/-, पंचवार्षिक वर्गणी रु.४५०/- परदेशात अंक पाठविण्यासाठी टपालखर्च रु. १००/- अधिक.

(२) मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) वर्गणी रु. १,००० आणि नोंदणी शुल्क रु. १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिकेचा'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** पाठवल्यास आपला पत्ता न विसरता लिहावा. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत रुपये २०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीसाठी नवे दर :** पूर्ण पान रु.२,५००/-, अर्धे पान रु.१,५००/-, पाव पान रु.८००/-, शुभेच्छा रु.४००/-, आवरण पृष्ठ तीन रु. ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---






पाणिनी : इ. पू. ५वे शतक • जन्म : शलातूर (आता लाहूर - पाकिस्तान) • पहिला संस्कृत वैयाकरण • अष्टाध्यायी

बुकपोस्ट-बुकपॅकेट-त्रैमासिक
R. N. I. नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३

**विजय प्रभाकर पाध्ये**
४ चित्रा बी, विद्यासागर सोसायटी,
महेश सोसायटी परिसर, बिबवेवाडी,
पुणे - ४११०३७

प्रेषक
कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद
३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, गल्ली क्र.५
वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. (दू. क्र. २४४८६०१५)








